


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

२८५८

अं.१०२. १०४, १०५

संपादक - विष्णु भिकाजी कोलते

वर्ष २५ वे अंक १०२ जुलै - सप्टेंबर १९५२

वर्ष २५ वे अंक १०४ जानेवारी - मार्च १९५३

वर्ष २५ वे अंक १०५ एप्रिल - जून १९५३

अनुक्रमणिका



महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २५-वें, अंक १०२ ] [ जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९५२

१०२

## अनुक्रमणिका





अनुक्रमणिका



## १०८ व १०९ या अंकांतील लेखक

श्री. भ. श्री. पंडित : एम्. ए. अमरावती येथील विदर्भ महाविद्यालयांत मराठीचे प्राध्यापक. 'पिचलेला पावा' 'उन्मेष आणि उद्रेक' 'बीजेची कोर' 'चतुर्थीचा चांद' 'अष्टमीचा चंद्र' 'पौर्णिमेचें चांदणें' इत्यादि काव्यसंग्रह. 'सवडीचे क्षण' हा लघुनिबंधसंग्रह.

श्री. गो. रा. दोडके : बी. ए. नागपूर; कवि, कथालेखक आणि निबंधकार. नागपूर येथील 'लोकांच्या शाळेंत' शिक्षक.

श्री. रा. अ. काळेले: बी. ए., एल्एल्. बी., काव्यतीर्थ, इंदूर; इंदूर दरबारचे राजकवि. मध्यभारतांतील पोलिसखात्यांतील अधिकारी 'वाग्वसन्त' 'ओळखीचे सूर' 'भावपूर्णा' 'गीतनिर्वाण' इत्यादि काव्यसंग्रह.

श्री. वि. म. कुळकर्णी : एम्. ए. सोलापूर येथील दयानंद कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक. काव्यसंग्रह : 'पहाट-वारा' 'विसर्जन'; संपादक : 'नवे पंख'; 'मराठी सुनीत'.

श्री. वामन चोरघडे : एम्. ए. नागपूर येथील वाणिज्य महाविद्यालयात अर्थशास्त्राचे प्राध्यापक. संपादक : युगवाणी (विदर्भ-साहित्य-संघ), 'सुषमा' 'हवन' 'यौवन' 'प्रस्थान' 'पाथेय' 'संस्कार' इत्यादि कथासंग्रह. 'प्रभावती' 'चंपाराणी' 'अबोली' इत्यादि कथा. 'साहित्याचें मूलधन' आणि इतर अनेक निबंधसंग्रह.

कु. सरोजिनी बाबर: एम्. ए. पीएच्. डी. मुंबई-विधान-सभेच्या सभासद; संपादक : समाज शिक्षणमाला, ग्रंथ: 'वडीलधारी माणसें;' 'तूं भेटायला नको होतास'; 'जात्यावरील गोड गाणीं', इत्यादि.

श्री. सौ. शांता शेळके : एम्. ए. काव्य-संग्रह : 'वर्षा'.कादंबऱ्या 'ओढ', 'मायेचा पाक्षर'; तालपुष्कर, इत्यादि.

श्री. श्री. ना. बनहट्टी: एम्. ए., एल्एल्. बी. सेवानिवृत्त मराठीचे प्राध्यापक : केंद्रीय सरकारच्या परिभाषा कार्यालयांतील अधिकारी. मयूर-काव्य-विवेचन, ज्ञानोपासना आणि भारतीयांचें कर्तव्य; एकावली इत्यादि ग्रंथ; संपादक : नलदमयंती स्वयंवराख्यान, आर्याकेकावली, संपादक: 'समाधान' साप्ताहिक

श्री. ग. त्र्यं. देशपांडे: एम्. ए., एल्एल् बी. उमरावती येथील श्रीशिवाजी विद्यालयांत संस्कृत व कायदा यांचे प्राध्यापक; लोकविद्यापीठाचे रजिस्ट्रार व संपादक: किरातार्जुनीयम्; रुक्मिणी-स्वयंवर (विठ्ठल) इत्यादि.

श्री. द. के. केळकर : बी. ए. मुंबई येथील राम-नारायण रुइया कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक. काव्यालोचन, संस्कृतिसंगम, उद्यांची संस्कृति, वादळी वारे, साहित्य विहार; विचारतरंग इत्यादि ग्रंथ.

श्री. के. ना. वाटवे: एम्. ए., पीएच्. डी. सर परशुरामभाऊ कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. महाराष्ट्र—साहित्य पत्रिकेच्या संपादक-मंडळाचे सदस्य, ग्रंथ : रसविमर्श; संस्कृत काव्याचे पंचप्राण.

श्री. म. ना. अदवंत : एम्. ए. जळगांव (पू. खानदेश) येथील मूळजी जेठा कॉलेजमध्ये मराठीचे प्राध्यापक. ग्रंथ : मनाचे संकल्प.

कुसुमाग्रज : मूळ नांव श्री. वि. वा. शिरवाडकर; बी. ए. काव्यसंग्रह : जीवनलहरी, विशाखा, मेघदूत इत्यादि. नाटकें : दूरचे दिवे; दुसरा पेशवा.

शरच्चंद्र मुक्तिबोध : एम्. ए., समाज शिक्षण खातें म. प्र; नागपूर, काव्यसंग्रह: नवी मळवाट.

मंगेश पाडगांवकर : काव्यसंग्रह: धारानृत्य.

श्री. सौ. कुसुमावती देशपांडे: बी. ए. (ऑनर्स); नागपूर महाविद्यालय, नागपूर येथे इंग्रजीच्या प्राध्यापक; दीपकळी, दीपदान, मोळी हे लघुकथासंग्रह.

श्री. ना. ग. जोशी: एम्. ए., पीएच्. डी. बडोदे महाविद्यालयांत प्राध्यापक, ग्रंथ. जीवनयोग; विश्वमानव इत्यादि.

श्री. शं. गो. तुळपुळे :एम्. ए., पीएच्. डी. पुणें विद्यापीठाचे मराठीचे प्राध्यापक. यादवकालीन मराठी भाषा, पांच संत कवि, महाराष्ट्र सारस्वत—पुरवणी इत्यादि ग्रंथ संपादक : मराठी निबंधकार; प्राचीन मराठी गद्य.

श्री. सुरेश म. डोळके : एम्. ए. मराठीचे प्राध्यापक, विदर्भ महाविद्यालय, अमरावती.

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

---

## महाराष्ट्र साहित्य संमेलन, अधिवेशन ३५ वें, अमळनेर ( पू. खा. )

## माहितीपत्रक

संं. कार्यवाह

प्रा. म. वि. फाटक

श्री. मो द. ब्रह्मे

कार्यालय :

प्रताप कॉलेज, अमळनेर ( पू. खा. ).

म. सा. संमेलनाचें ३५ वें अधिवेशन अमळनेरला ता. १२, १३, १४ आक्टोबरला प्रा. कृ. पां. कुळकर्णी यांच्या अध्यक्षतेखालीं भरणार आहे. याप्रसंगीं आपण यावें व संमेलन यशस्वी करण्यास हातभार लावावा अशी विनंती आहे.

संमेलनास आरंभ ता. १२ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां होईल. श्रीमंत प्रतापशेटजी यांनी संमेलनाचें उद्घाटन करण्याचें मान्य केलें आहे. या संमेलनांतर्गत ' मराठींतील टीकावाङ्मय ' व 'मराठीचें अध्यापन' अशीं दोन शाखासंमेलनें भरविण्यांत येणार आहेत व त्यासाठीं अनुक्रमें प्रा. श्री. के. क्षीरसागर व प्रा. डॉ. शं. दा. पेंडसे हे अध्यक्ष म्हणून निवडले गेले आहेत. प्रा. फडके, आचार्य अत्रे, प्रा. माटे, म. म. पोतदार, श्री. माडखोलकर, श्री. खांडेकर, डॉ. कोलते, श्री. यशवंत, गिरीश, सोपानदेव चौधरी, कुसुमाग्रज, प्रा. काणेकर, प्रभाकर पाध्ये इत्यादि ख्यातनाम साहित्यिक मंडळी येऊन संमेलनांत भाग घेणार आहेत.

प्रतिनिधीची वर्गणी तीन रुपये आहे. अमळनेर येथील संमेलनाच्या तीन दिवसांचा निवास व भोजनखर्च दहा रुपये येईल. तरी या सोयीचा फायदा घेणाऱ्यांनीं ता. ८ आक्टोबर-पर्यंत कार्यालयांत कळविल्यास कार्यकर्त्यांना सोयीचें वाटेल.

[illegible]
दिलें अज्ञातास दान
हाच दिलासा तयास.

— कुसुमाग्रज

---

अनुक्रमणिका



महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २५ वें, अंक १०२ ] [ जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९५२

## १०२

महाकवि—

माझ्या शब्दांचीं तारवें
आज प्रवासा निघालीं
नभीं—विशाल सुमनें
शुभ्र शिडांचीं फुललीं.

हर्ष उत्साह पेरीत
चाले वाऱ्याची वर्दळ
कुजबुजें किनाऱ्याशीं
निळें बंदरांत जळ.

उभा पूर्वेस मांडव
सोनवेलींचा सुंदर
नव्या किरण-फुलांचा
पडे अंबरीं मोहर.

चार दिशांच्या देवता
उभ्या देहलीवरती
हातीं मेघांचीं तबकें
त्यांत ज्योतींची आरती.

सागराच्या अनंतांत
इंद्रनीलांनी खचित
मार्ग करी हा समोर
माझ्या नौकांचें स्वागत.

जाणें अज्ञात भूमींत
जाणें अज्ञात काळांत
माझ्या आंतर देशींची
सर्व घेऊन दौलत.

ठरे मागुती बंदर
आता अेकाकी उदास
दिलें अज्ञातास दान
हाच दिलासा तयास.

— कुसुमाग्रज

---

अनुक्रमणिका



## गोड निळेपणा—

गोड निळेपणा आहे
उंच आकाशांत
गोड मधुरिमा रमे
खिन्नशा मनांत

तलावाच्या निळ्या लाटांवर
हर्षे ऊन
मनशोक्त हसावेसें
वाटे की मधून

आकाशांत तरतात
हंस पांढरे
मनामध्ये नव्यानेच
कुणी वावरे

कची मनांतली जखम
दुखे पण गोड
फिक्या दुपारीं बसून
जुन्या नावा सोड

—शरच्चंद्र मुक्तिबोध

## खरें आहे—

खरें आहे उगीचच केला कांगावा
मनांमध्ये झुरणारा ठेवून रावा
आता हातामध्ये हात गुलाबी घेऊन
आंसवांतून एकमेका बघूं निरखून

—शरच्चंद्र मुक्तिबोध

## अजून व्हायची जरी पहाट....

अजून व्हायची आहे पहाट !
अजूनहि सारीं झाडें अंधारांत झाकलेलीं
निर्जन ही नीरवता ओथंबून वाकलेली
अंधुक दिसते पाउलवाट
अजून व्हायची आहे पहाट !

उमलली आहे—नाही शुभ्र 'स्वस्तिकाची' कळी
क्षितिजाच्या मनांतली उठली न सोनसळी
प्रशांत दिशांत अंधार दाट
अजून व्हायची आहे पहाट !

अस्पष्टाच्या सीमेवर अंधुक डोंगर दिसे
अशा अंधाराच्या वेळीं वास्तव आभास भासे
वेढी काळोखाचें शून्य विराट
अजून व्हायची आहे पहाट !

पण जाणिवेची गळे कशी तमाची ओढणी !
उरीं उघडली कशी प्रकाशाने ही पापणी !
आंतल्या प्रकाशीं नाहली रात
अजून व्हायची आहे पहाट !

आंत बाहेर हें आता अंतर उरावें कसें ?
शब्द फसवेच सारे नित्य फसविती असे !
गळून पडला अंतर—पाट
अजून व्हायची जरी पहाट !!

— मंगेश पाडगांवकर

---

अनुक्रमणिका

## एक संध्याकाळ ( चिन्तनिका ) 

कुसुमावती देशपांडे

श्रावणांतली दुपार. दररोज यावेळीं आभाळ भरून येतं. चार साडेचारच्या सुमारास धारा बरसायला लागतात. सृष्टि ओलीचिंब होऊन जाते. कितीतरी दिवस वाट पाहिल्यावर पावसाची कृपा झाली आहे. पहिल्या सरींच्या दिवसांतला उष्मा आणि कुंदपणा जाऊन गारव्याचा आल्हाद पसरला आहे. सुखाचीं, सुगीचीं स्वप्नं फुलून येऊन मनं निश्चित झालीं आहेत....

अशाच एका दुपारीं दिवसाचं ठरीव काम आटोपून मी घरीं येऊन विसांवले. या रम्य पावसाळी हवेचा आपल्याच तऱ्हेनें मनमुराद आस्वाद घ्यायचा, हें ठरवलं आणि एक पातळ पायावर घेऊन, खिडकीजवळच्या तक्क्याशीं लेटलें. मधूनच वाऱ्याच्या झोताबरोबर पावसाचे तुषार अंगावर येत आणि एक गोड शिरशिरी येई. घरांत, बाहेर, सारीकडे अगदी शांत होतं. आता संध्याकाळपर्यंत इथून उठायचं कारण नाही, कांही काम नाही, कुठली सभा नाही, कोणीहि येण्याचा संभव नाही, असं आनंददायक आश्वासन पुनःपुनः स्वतःला दिलं आणि मग मीं प्रा. सी. ई. एम्. जोड यांना पाचारण केलं. गेल्या दोन दिवसांपासून ते माझ्या टेबलावर बसले होते आणि त्यांना बर्नर्ड शॉविषयी काय विलक्षण आदर वाटत आला हें सांगण्यासाठी धडपडत होते. आज त्यांना आपलं शॉ-पुराण निर्वेधपणें सांगतां येणार होतं...

केवढ्या उत्साहाने, किती रसाळपणें, ते आपल्या ' देवमाणसा ' विषयी बोलत होते— आणि त्याबरोबरच आपल्या विद्यालयीन जीवनाविषयी. ते दिवस—आजच्या या युगापेक्षा किती वेगळे होते ते दिवस...

प्रा. जोड मला सांगत होते, " संस्कृतीच्या कल्पनेंत अंतर्भूत असलेली एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे कला आणि कलावंत यांचेविषयी आदर. सर्वसाधारण वा नित्याच्या संभाषणांतहि साहित्य, संगीत, चित्रकला इत्यादींवर बोलणं कुणालाहि शक्य होणं हेंहि एक संस्कृतीचं गमक आहे. १९१४ पूर्वीच्या काळांत कला आणि कलावंत यांना जेवढं महत्त्व प्राप्त झालं होतं तेवढं त्यानंतर कधीच त्यांना मिळालं नाही त्यावेळीं शासनाचा कारभार कसा चालला आहे याची कुणालाच फारशी फिकीर बाळगण्याचं कारण नसे. कारण, तेव्हा शासनाच्या अधिकाराने जीवन एवढं व्यापलं गेलं नव्हतं....राजकारण, राजकारणी पुरुष वा शासनाधिकारी यांची चर्चा करण्याचा विशेष प्रसंग येत नसे. १९१४ पूर्वी देशांतल्या अंतर्गत घडामोडीं-विषयींहि विचार करण्याची आवश्यकता आम्हांवर लादली जात नसे. मग परराष्ट्रीय संबंधां-विषयी कोण फिकीर बाळगणार ? याचा अर्थ असा की फॅसिझम् , कम्युनिझम, इत्यादि भानगडींत आम्हांला पडावं लागत नसे. आणि नव्या नव्या वैज्ञानिक भानगडी निर्माण करणाऱ्या वैज्ञानिकांचाहि आम्हांला ताप नव्हता...आणि म्हणून...म्हणून तऱ्हतऱ्हेचीं पुस्तकं, संगीत, नाटकं, चित्रं, तत्त्वज्ञान यांच्याविषयी आम्ही नित्य बोलत असू....त्यांच्या निर्मात्यांविषयी आम्हांला कमालीचा आदर वाटे...."

तेव्हाचा काळ आणि आताचा ! तें युद्धपूर्व जग आणि आताचं हें युद्धोत्तर जग ! किती कुशलपणें, वेचक शब्दांत आणि हिरिरीने प्रा. जोड बोलत होते. सुखी होते तेव्हाचे लोक.

* Shaw: by C. E. M. Joad. pp. 32-33.

साहित्याच्या निर्मळ पुष्करिणींत यथेच्छ विहार करीत बसायला त्यांना सवड होती, त्याची त्यांना आवड होती, व आवडीप्रमाणे जगूं लागलं तर त्यांतून ओढून काढील, अशी कोणती विवंचनाहि नव्हती म्हणायची. "सुखी खरेच, आणि सुसंस्कृतहि"...माझ्या भोवतालच्या उच्चदार वातावरणांतून व पुस्तकांच्या रांगांतून जणु पडसाद निघाला—

...पडसाद निघाला, पण लगेच कांहीतरी खटकलं...तेव्हाच्या जगाविषयी विषादपूर्ण हुरहूर माझ्या मनांत भरून राहीना...आणि, कां कोण जाणे—प्रा जोड यांचे शब्द मनाला रुचेनात. साहित्य आणि संगीत यांच्याविषयी केवळ नित्याच्या संभाषणांत बोलणं शक्य होणं, चार सुशिक्षित वा विद्यालयीन मंडळी जमली म्हणजे त्यांच्या संभाषणाचा ओघ या विषयांकडे स्वाभाविकपणें वळणं, हें संस्कृतीचं एक गमक व हें लाभत होतं म्हणून स्वतःला धन्य मानणं ....मला रुचेना, मुळीच पटेना...

यासाठीच का सारे प्रतिभावंत शिणले? चार शिष्ट लोकांच्या शिळोप्याच्या गप्पांचा विषय होण्यासाठी? प्रा. जोड--तुम्हांला अन्याय होत असेल कदाचित्. तुमचं जग राजकारणानं ग्रासलं गेलं नव्हतं—तुम्ही भाग्यवान् खरे. पण तरीहि तुमचं हें म्हणणं मला पटत नाही. तुम्ही स्वतःहि विस्ताराने याच विषयावर लिहायला लागलां तर कदाचित् असं म्हणणार नाही. तुमचा 'देवमाणूस' बर्नर्ड शॉ हा तरी काय म्हणेल हे शब्द पाहून?...

माझं मन प्रा. जोड यांच्याशीं वाद घालीत बसलं. त्यांचं शॉ—माहात्म्य बंद पडलं. पण माझ्या मनाला स्वतःचंहि म्हणणं नीट कळेना...प्रा. जोड यांच्या ओघवती शैलीने गुंगलेल्या त्या मनाला काय म्हणायचं आहे तें नीट कळेना. अर्धवट जाग्या झालेल्या मुलासारखं तें कुरकुरत बसलं....

बाहेर पावसाला खूप जोर आला होता. अखंड धारा गळत होत्या. माझ्या मनोविश्वांत एकामागून एक थोर कृती व त्यांच्या निर्मितीचे संभाव्य मूलस्रोत उभे रहात होते. त्यांचे ते निर्माते जीवनांतील नानाविध समस्यांपासून दूर रहात होत का?...

जीवनांतील समस्या—आजच्या समस्या...आजचं साहित्य...

माझ्या खिडकीपाशीच एक आवाज आला—

... "बाई..."

धारा गळत होत्या. त्यांच्या वर्षावांतच दरवर्षी श्रावणमध्यांत अचूकपणें दर्शन देणारा आमचा म्हातारा गवतवाला उभा होता. बरसणाऱ्या धारा व त्याचं मस्तक, त्याचं हाडकुळं, जीर्ण वस्त्रांनी जेमतेम लपेटलेलं शरीर यांच्यामध्ये केवळ एक घोंगडीसारखं दुमडलेलं पोतं होतं. त्याच्या कांकडलेल्या बोटांनी तें कानाजवळ घट्ट धरलं होतं.—

"आलास बाबा..."

"हो जी..."

"म्हातारी बरी आहे..."

"हो जी..."

"हं—काय भाव यंदा भाऱ्याचा...?"

---

"Normal topics of casual and polite conversation." —JOAD.

"काय सांगू बाई तुम्हांस..."

मीं त्याला यंत्रासारखे प्रश्न विचारले. यंदा भारेवाल्याजवळचं गवत घ्यायचं नाही, मोटरीवरचं ठोक गवतच वरं पडतं, असं आधी किती दिवसांपासून ठरवलं होतं. म्हशी चारणाऱ्या चरवायापासून दूध काढणाऱ्या स्वयंपाक्यापर्यंत सर्वांचं तसं मत पडलं होतं. तरी पण दोन मिनिटांत त्या म्हाताऱ्याला हवा होता तसा मोक्षमभराचा हिरव्या चाऱ्याचा करार झाला. म्हातारा, आपलं पोतं सावरीत, थबथबल्या पावलांनी निघून गेला....

पण माझ्या डोळ्यांपुढून त्याची मूर्ति हालेना. त्याच्या जोडीने त्याच्या म्हातारीचीहि मूर्ति तिथे उभी राहिली. त्यांच्या अनेक वर्षांच्या, पावसापाण्यांतल्या, कधी दिवसाकाठच्या, कधी दिवेलागणीच्या फेऱ्या, त्यांचीं दुखणीं, त्यांची औषधांची मागणी,......सारं सारं माझ्या डोळ्यांपुढे उभं राहिलं......

......आणि मग लख्खदिशीं मला काय म्हणायचं होतं तें कळलं. प्रा. जोड यांच्या विवेचनांत मला काय खटकत होतं तें कळलं......

त्या म्हाताऱ्याची थकली–भागली, ओली-चिंब मूर्ति......

हीच होती आजच्या राजकारणाचं कारण आणि साहित्याचं एक प्रयोजन......

आजच्या साहित्याचं मुख्य प्रयोजन......

आजच्या लक्षावधि मानवांचं अपार दैन्य आणि त्यांचे आमरण कष्ट यांची मूर्ति होती ती......

आणि त्यांच्या सोशिकपणाची आणि ऋजुतेचीहि.

अनेक युगांच्या मानवी जीवनाच्या कोड्याचं मूळ होती ती——

अनेक प्रकारच्या अंधश्रद्धांचं, पुनर्जन्माच्या आश्वासनाचं, स्वर्गप्राप्तीच्या भोळ्या आशेचं......

आणि तसंच......

कर्मयोगाच्या तत्त्वज्ञानाचं......

मानवी समतेच्या अट्टाहासाचं......

मानवी प्रयत्नांच्या अखंड परंपरेचं......

सर्व मानवी मूल्यांचं......

काव्याचं, कलेचं......

आणि, प्रा. जोड, तुम्ही केवळ हेंच म्हणणार——"काव्याविषयी, कलेविषयी, आम्ही किती निर्वेधपणें चर्चा करीत असूं...... !!"

---

अनुक्रमणिका

# साहित्य-शास्त्रांतील साहित्य  २  गणेश त्र्यंबक देशपांडे

( अंक १०१ –पान ३२ वरून पुढे चालू )

साहित्यशास्त्राच्या इतिहासांत ध्वन्यालोकाचें स्थान महत्त्वाचें आहे तें अशा दृष्टीने की, त्याच्या पूर्वीचे सर्व विचार–प्रवाह त्यांत अंतर्भूत झाले आणि नवीन प्रवाहांना त्याने चालना दिली. शब्दार्थमय काव्याचें वैशिष्ट्य कोणतें ? या प्रश्नाला "काव्यस्यात्मा ध्वनिः" असें ध्वनिकाराने उत्तर दिलें. याचे दोन अर्थ करण्यांत आले. एक रसध्वनि, आणि दुसरा ध्वनन किंवा व्यंजना–व्यापार.[३३] यांपैकी रसाचें आत्मत्व सर्वांना मान्य झालें. पण ध्वनन–व्यापाराबद्दल मात्र मतभेद होऊं लागले. ध्वनिकारापर्यंत काव्यवस्तूच्या स्वरूपाबद्दल चर्चा चालू होती. ती आनंदवर्धनानंतर थांबली. काव्याचें रसपर्यवसायित्व सर्वांना मान्य झालें. पण हें रसपर्यवसान कसें होतें याबद्दल मात्र मतभेद झाले. काव्यगत शब्दार्थांच्या वैशिष्ट्याची धर्ममुखाने व फलमुखाने होणारी चर्चा थांबून आनंदवर्धनानंतर ती चर्चा व्यापारमुखाने होऊं लागली असें म्हणतां येईल.

या चर्चेत भाग घेणारे राजशेखर, भट्टनायक, कुंतक, धनिक, महिमभट्ट, आणि भोज हे शास्त्रकार होत. या सर्वांना रसाचें काव्यात्मत्व मान्य आहे. पण शब्दार्थांतून रसास्वाद कसा मिळतो याबद्दल मतभेद आहे. यांचा विरोध आनंदवर्धनाच्या रसतत्त्वाशीं नसून व्यंजना–व्यापाराशीं आहे. वरील ग्रंथकारांपैकी कुंतक, धनिक, महिमभट्ट, व भोज यांचे संपूर्ण ग्रंथ उपलब्ध आहेत. राजशेखराची काव्यमीमांसा अपूर्ण असल्याने ध्वनिकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोन कसा होता हें सांगतां येत नाही. भट्टनायकाचा हृदयदर्पण हा ग्रंथ उपलब्ध नाही. पण अभिनवगुप्ताच्या लोचनटीकेंत, अभिनव भारतींत, तसेंच इतर लेखकांच्या ग्रंथांत त्याचीं मतें दिलीं आहेत, त्यांवरून अंदाज बांधतां येतो.

भट्टनायकाच्या मतें काव्यांत शब्दार्थप्राधान्य नसून व्यापारप्राधान्य असतें. शास्त्र व काव्य यांतील फरक तो असा दाखवितो—

शब्दप्राधान्यमाश्रित्य तत्र शास्त्रं पृथग्विदुः ।
अर्थतत्त्वेन युक्तं तु वदन्त्याख्यानमेतयोः ।
द्वयोर्गुणत्वे व्यापारप्राधान्ये काव्यधीर्भवेत् ॥

या व्यापारप्राधान्यांत, अर्थात्, व्यंजना-व्यापार तो मानत नाही. आणि तो मानला तरी त्याला अग्रस्थान द्यावयास तो तयार नाही.[३४] त्याच्या मतें काव्यांतील शब्दव्यापाराच्या

---

३३. ध्वनिकारिका, त्यावरील आनंदवर्धनाची वृत्ति ( आलोक ), आणि त्यावरील अभिनवगुप्ताची लोचनटीका, या क्रमाने ध्वनितत्त्वाचें विवेचन झालें आहे. कित्येकांचें असें म्हणणें आहे की मूळ कारिकांमधील संज्ञा वृत्ति आणि लोचनांत अधिकाधिक व्यापक करून त्यांच्यांत मुळांत नसलेला अर्थहि समाविष्ट करण्यांत आला. व अशा तऱ्हेने क्रमाक्रमाने 'ध्वनि'ला 'रसस्वरूप' देण्यांत येऊन मूर्धाभिषिक्त करण्यांत आलें. डॉ. डे प्रभृतींचें असें म्हणणें आहे. पण तें बरोबर नाही. मूळ कारिकाकारच रसध्वनीला अग्रस्थान देतो, हें नुसत्या कारिका एकत्र वाचल्या तरीहि दिसून येईल. रसध्वनीची काव्यात्मता कारिकाकारालाच अभिप्रेत होती.

३४. ध्वनिर्नामापरो योऽपि व्यापारो व्यंजनात्मकः ।
तस्य सिद्धेऽपि भेदे स्यात् काव्यांगत्वं न रूपिता ॥

तीन कक्षा आहेत. त्या अशा-अभिधा, भावना व भोगीकरण ( भोग किंवा रसचर्वणा. )[३५] पैकी अभिधा ही काव्य व शास्त्र यांना सामान्य आहे. भावनाव्यापारामुळे विभावादिकांचें साधारणीकरण होतें व भोगीकृतीने रसिक स्वसंवेद्य असा रसास्वाद घेतो.[३६] अशाप्रकारें व्यंजना-व्यापाराचें प्राधान्य अमान्य करूनहि काव्यांत भोग-व्यापाराचें प्राधान्य तो दाखवितो.[३७] धनंजयाच्या दशरूपावर धनिकाची टीका आहे. त्यांतील रस प्रकरणांत धनिकाने व्यंग्यव्यंजकतेचा निरास करून भाव्यभावकतेचा संबंध दाखविला आहे.[३८] तेव्हा तोसुद्धा भट्टनायकाचा अनुयायी असावा असें म्हणतां येतें.

महिमभट्टाचा व्यक्तिविवेक नांवाचा ग्रंथ आहे. त्यांत त्याने असें दाखविलें आहे की, ध्वनीला स्वतंत्र अस्तित्व नसून त्याचा अंतर्भाव अनुमानांतच होतो.[३९] इतकेंच नव्हे तर तो शब्दाची लक्षणाशक्ति आणि वक्रोक्ति हीं सुद्धा मानत नाही. ते देखील अनुमानाचेच प्रकार आहेत असें त्याचें म्हणणें आहे. त्याच्या मतें वाच्य आणि अनुमेय असे शब्दाचे दोनच अर्थ आहेत. त्यांपैकी शब्दव्यापाराने ज्ञात होणारा अर्थ वाच्य होय. व त्यावरून लिंगलिंगि संबंधाने ज्ञात होणारा अर्थ अनुमेय होय या अनुमेयाचे तीन प्रकार आहेत. वस्तु, अलंकार, व रस. पैकी वस्तु आणि अलंकार वाच्यांतहि सापडतात. रस मात्र अनुमेयच आहे.[४०] महिम-भट्टाच्या या मताचें खंडन मम्मटाने काव्यप्रकाशाच्या पांचव्या उल्लासांत केलें आहे. महिम-भट्टाचें हें मत साहित्य शास्त्रांत मान्य झालें नाही व त्याला पुढे अनुयायीहि मिळाले नाहीत. पण व्यक्तिविवेकांत त्याने केलेलें काव्यदोषविवेचन मात्र पुढील अलंकारिकांना मार्गदर्शक झालें.

---

३५. अभिधा भावना चान्या तद्भोगीकृतिरेव च ।
अभिधा धामतां याते शब्दार्थालंकृती ततः ॥
भावनाभाव्य एषोऽपि शृंगारादिगणो मतः ।
तद्भोगीकृतिरूपेण व्याप्यते सिद्धिमान् नरः ॥

३६. काव्यप्रकाशाच्या चतुर्थ उल्लासांतील रसविवेचन पाहा.

३७. भट्टनायकेन तु व्यंग्यव्यापारस्य प्रौढोक्त्याभ्युपगतस्य काव्यांशत्वं ब्रुवता न्यग्भावितशब्दार्थस्वरूपस्य व्यापारस्यैव प्राधान्यमुक्तम् ।.

—अलंकारसर्वस्व.

३८. न रसादीनां काव्येन सह व्यंग्यव्यंजकभावः । किं तर्हि भाव्यभावक संबंधः । काव्यंहि भावकम् । भाव्या रसादयः।—दशरूप. ४।३७ वरील धनिकाची टीका.

३९. अनुमानांतर्भावं सर्वस्यापि ध्वनेः प्रकाशयितुम् ।
व्यक्तिविवेकं कुरुते प्रणम्य महिमा परां वाचम् ॥

४०. अर्थोऽपि द्विविधो वाच्योऽनुमेयश्च । तत्र शब्दव्यापारविषयो वाच्यः । स एव मुख्य उच्यते ।...तत एव तदनुमिताद्वा लिंगभूतात् अर्थांतरमनुमीयते सोऽनुमेयः । सच त्रिविधः—वस्तुमात्रम्, अलंकारा, रसादयश्चेति । तत्र आद्यौ वाच्यावपि संभवतः । अन्यस्तु अनुमेय एव ।

भोज आणि कुंतक यांच्याकडे वळण्यापूर्वी आणखी एका पक्षाचा विचार केला पाहिजे. हा पक्ष अन्विताभिधानवादी तात्पर्यवाद्यांचा होय. यांच्या मतेंहि ध्वनि किंवा व्यंजना हा व्यापार मानण्याची कांही गरज नाही. रस हा वाक्यार्थच होय. ' सोऽयं इषोरिव दीर्घदीर्घतरो व्यापारः ' असें त्यांचें अभिधेबद्दल मत आहे. अभिधा-व्यंजना इत्यादि भेद न करतां काव्यांतील शब्दार्थांत जेवढा म्हणून अभिप्राय समाविष्ट होतो तेवढा सर्व अभिधेनेच कळतो. या मताचा पुरस्कार प्रथम भट्टलोल्लटाने केला व पलीकडे धनिकाने त्याला पुष्टि दिली. तो म्हणतो, तात्पर्याची कक्षा एवढीच आहे असें मानण्याचें कारण नाही. तात्पर्यशक्ति तराजूंत तोलली जाते, असें थोडेंच आहे ? [४० अ]

भट्टनायक, धनिक, महिमभट्ट, किंवा भट्टलोल्लट यांचें कांही बाबतींत साम्य आहे. काव्यांतील रसास्वादाला व्यंजनावृत्तीची गरज आहे असें यांच्यापैकी कोणालाच वाटत नाही. रसाचें आत्मत्व हें सर्वांनाच मान्य आहे. पण त्याची मीमांसा भोगव्यापार, अनुमितिव्यापार किंवा तात्पर्यव्यापार यांनी करतां येते असें त्यांचें म्हणणें आहे. ह्यांचें हें म्हणणें समर्थनीय कसें नाही हें आनंदवर्धनानंतर अभिनवगुप्ताने व त्यानंतर मम्मटाने दाखवून ध्वनितत्त्वाची पुनः प्रतिष्ठा केली. ध्वनितत्त्वाने अलंकारशास्त्रांतील तत्त्वांची योग्य व्यवस्था लागली असें रसगंगाधरांत जगन्नाथ म्हणतो. ( ध्वनिकृताम् आलंकारिकसरणिव्यवस्थापकत्वात् )

दुसरी गोष्ट म्हणजे, रसिकाला काव्यांतून रसास्वाद कसा मिळतो या दृष्टीने विवेचन केलें. हें व्यापारमुखाने विवेचन खरें, पण तें रसिकव्यापारमुखाने विवेचन आहे. कविव्यापारमुखाने नव्हे. कविव्यापारमुखाने साहित्यविवेचन भोज आणि कुंतक यांनी केलें आहे तें आपण आता पाहूं.

भोज आणि कुंतक यांनी कविव्यापारमुखाने साहित्यविवेचन केलें. त्यामुळे त्यांच्या या विवेचनाला वळणहि वेगळें लागलेलें दिसेल. साहित्य म्हणजे काय हा प्रश्नच त्यांनी सरळ विवेचनाला घेतला आहे. शृंगारप्रकाशांत सुरवातीसच भोज म्हणतो [४१] —

" तत् ( काव्यम् ) पुनः शब्दार्थयोः साहित्यं आमनन्ति । तद्यथा ' शब्दार्थौ सहितौ काव्यम् ' इति । कः पुनः शब्दः ? येन उच्चरितेन अर्थः प्रतीयते । ...कोऽर्थः ? यः शब्देन प्रत्यायते। ...किं साहित्यम् ? यः शब्दार्थयोः सम्बन्धः । स च द्वादशधा—अभिधा, विवक्षा, तात्पर्यम्, प्रविभागः, व्यपेक्षा, सामर्थ्यम्, अन्वयः, एकार्थीभावः, दोषहानम् गुणोपादानम्, अलंकारयोगः, रसावियोगः, इति । "

—काव्य म्हणजे शब्दार्थांचें साहित्य होय असें सांगतात. जसें "शब्दार्थौ सहितौ काव्यम् " असें भामह म्हणतो. आता शब्द कोणता ? जो उच्चारतांच अर्थ प्रतीत होतो तो. अर्थ कोणता ? जो शब्दाने प्रतीत होतो तो. बरें, साहित्य म्हणजे काय ? साहित्य म्हणजे शब्दार्थांचा संबंध. हा संबंध बारा प्रकारचा असतो. ते बारा प्रकार भोजाने एकत्र दिले व त्यांचें विवेचन केलें. हें विवेचन म्हणजेच शृंगारप्रकाश होय.

---

४०. अ एतावत्येव विश्रांतिः तात्पर्यस्येति किं कृतम् ।
यावत् कार्यप्रसारित्वात् तात्पर्यं न तुलाधृतम् ।।

४१. भोजः शृंगारप्रकाश ( श्रीरंगमप्रत ) पान ४.

या सर्वांचें विवेचन येथे करणें शक्य नाही. पण एवढें मात्र सांगतां येईल : भोजाने सांगितलेल्या बारा संबंधांत पहिले आठ व्याकरणाश्रित व शेवटले चार काव्याश्रित आहेत. व्याकरणाश्रित आठ संबंधांचेहि केवलशक्तिमूल व सापेक्षशक्तिमूल असे भाग केले आहेत. डॉ. व्ही. राघवन् यांनी शृंगारप्रकाशावरील आपल्या ग्रंथांत हे संबंध कोष्टकरूपाने दाखविले आहेत. ते येथे वाचकांच्या सोयीकरिता देतों.[४२]




असे बारा प्रकारचे शब्दार्थसंबंध देऊन भोज काव्यदृष्टीने त्यांची गरज सांगतो —

" तत्र अभिधाविवक्षादिभिः निरूपिते शब्दार्थयोः साहित्ये, वाक्यस्य प्रयोगयोग्यता, प्रयोगानर्हता च निश्चीयते।... सम्यक् प्रयोगश्च तदा उपपद्यते, यदा दोषहानम्, गुणोपादानम्। अलंकारयोगः, रसावियोगश्च भवति। "

---

४२. Bhoja's Shingar Prakash: Page 94.

४३. शारदातनयाने आपल्या भावप्रकाश या ग्रंथांत द्वादशविध संबंधांचे असेच तीन भाग दिले आहेत.

द्वादशधा संबंधः शब्दस्यार्थस्य यः स साहित्यम्।
त्रिस्कंधः स चतुर्भिस्तथा चतुर्भिश्चतुर्भिश्च ॥
वृत्तिर्विवक्षातात्पर्यप्रविभागाविहोदितौ।
ततो व्यपेक्षासामर्थ्यान्वयाश्चैकार्थभावना ॥
दोषहानं गुणादानं तथालंकारयोगिता।
रसावियोग इत्येते संबंधाः कथिता बुधैः ॥

२

—अभिधा इत्यादि आठ संबंधांमुळे वाक्यप्रयोग योग्य आहे किंवा नाही हें ठरवितां येतें. पण सम्यक् प्रयोग तेव्हाच उपपन्न होऊ शकतो की जेव्हा वाक्य निर्दोष, गुणयुक्त, अलंकृत आणि सरस असतें.—तात्पर्य, काव्यशास्त्रांतील दोष, गुण, अलंकार आणि रस यांचें विवेचन हें शब्दार्थसाहित्याचेंच विवेचन होय.

काव्यशास्त्रावरील संस्कृत ग्रंथांत विवेचनाचे असेच चार विभाग केलेले दिसतील. त्या ग्रंथांतील विवेचन शास्त्रीय विवेचन आहे व तें काव्याचें, त्याचप्रमाणें शब्दार्थसाहित्याचेंहि विवेचन आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे काव्यशास्त्राला साहित्यशास्त्र आणि काव्याला साहित्य कां म्हणतात हेंहि लक्षांत येईल; आणि परिशिष्टांत दिलेलीं काव्यलक्षणें तशींच कां आहेत हें कोडें सुटेल.

मम्मटानें केलेलें काव्यलक्षण, या दृष्टीने विचार करण्यासारखें आहे. "तददोषौ शब्दार्थौ सगुणावनलंकृती पुनः क्वापि" असें मम्मटानें काव्यलक्षण दिलें आहे. या लक्षणावर पुढील ग्रंथकारांनी फार झोड उठविली. त्यांनी या लक्षणाची परीक्षा न्यायशास्त्राच्या अवच्छेदावच्छेदक दृष्टीनें केली आहे; साहित्यदृष्टीनें केली नाही. साहित्यदृष्टीने पाहिलें म्हणजे या व्याख्येंत काव्यगत शब्दार्थसाहित्याचें स्वरूप दिलें आहे हें दिसून येईल; आणि ही व्याख्या चांगली ठरेल. अदोषौ आणि सगुणौ यांत दोषहान आणि गुणोपादान हे साहित्यधर्म आहेत. 'अनलंकृती पुनः क्वापि' याचें व्याख्यान 'प्रायः सालंकारौ' असें त्यानेच केलेलें आहे. तेव्हा मम्मटाला बहुंशीं अलंकृत शब्दार्थच अपेक्षित आहेत हें दिसतें. बरें अपवादात्मक म्हणून त्यानें जें उदाहरण ( निःशेषच्युतचन्दनम् ) घेतलें तेथेसुद्धा अलंकार नाहीच असें नाही. "अत्र स्फुटो न कश्चिदलंकारः" असें तो म्हणतो. तेथे अलंकाराभाव नाही, अलंकाराची अस्फुटता आहे. तेव्हा अलंकारयोग हा साहित्यधर्महि तेथे अपेक्षित आहे. मम्मटाच्या व्याख्येंत काव्यात्मा जो रस त्याचा निर्देश नाही, हा त्याच्या व्याख्येवर सर्वांचा आक्षेप आहे. पण मम्मटाच्या अर्थ शब्दांत व्यंग्यार्थ समावतो व व्यंग्यार्थात रसध्वनि समावतो ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्यांत रसावियोग हा साहित्यधर्महि आहे असें दिसून येतें. आणि रसावियोगाची ही गोष्ट मम्मटाला अपेक्षित आहे हें त्यानें ज्या पद्धतीनें व क्रमानें विवेचन केलें ती पद्धत व क्रम लक्षांत घेतला म्हणजे दिसून येईल. न्यायशास्त्रीय विवेचनपद्धति आणि साहित्यशास्त्रीय विवेचनपद्धति यांच्या दृष्टिकोनांतील फरक लक्षांत घेतल्याशिवाय मम्मटाच्या व्याख्येचें स्वारस्य लक्षांत येत नाही.

मम्मटाची व्याख्या सदोष असली तरीहि मम्मटापूर्वी झालेल्या साहित्यशास्त्रीय वादांचा तींत समन्वय आहे, असें डॉ. सुशीलकुमार डे तिचें समर्थन करितात, तें ठीक. पण तें साहित्यशास्त्रीय समर्थन नव्हे. ध्वनिकारापूर्वीचे वाद हे एकांगी आणि आग्रही होते. केवळ वाच्यवाचकसंबंध, केवळ वक्रोक्ति, केवळ गुण या कोणत्या तरी एकाच अंगाला प्राधान्य देऊन त्यांनी विवेचन केलें. त्यामुळे ते वाद उत्पन्न झाले. आनंदवर्धनाने ध्वनिविवेचनाच्या द्वारें या सर्व अंगांचीच नव्हे तर शब्दगत प्रकृतिप्रत्ययांचीसुद्धा साहित्यदृष्टीने व्यवस्था लावली. ( ध्वन्यालोक तृतीयोद्योत पाहा. ) या परंपरेंत साहित्यज्ञान मिळविलेल्या मम्मटाची ही निराग्रही व्याख्या पाहिली म्हणजे साहित्यदृष्टीने त्या व्याख्येचें महत्त्व पटतें. मम्मटाच्या ग्रंथानें शब्दार्थसाहित्य-विवेचनाला पूर्णता आली. ती इतकी की, पुढील सर्व ग्रंथकारांनी त्याच्या पद्धतीचें अवलंबन केलें. मात्र त्या बरोबरच मम्मटाचा साहित्य शास्त्रीय दृष्टिकोन

त्यांनी घेतला नाही. न्यायशास्त्राच्या दृष्टिकोनांतून त्यांनी काव्यलक्षण करावयास सुरवात केली व मम्मटाच्या व्याख्येचे वाभाडे काढले. पण असें करतांना त्यांचींच काव्यलक्षणें जास्त टीका-विषय झालीं, हें त्यांच्या लक्षांत आलें नाही.

कुंतकाच्या साहित्यविवेचनास हात घालण्यापूर्वी आणखी एका गोष्टीचा खुलासा करणें अवश्य आहे. भोजानें शब्दार्थसाहित्याचें विवेचन करतांना शब्दसंबंधशक्तींचें विवेचन करण्यांत सुरुवातीचे आठ प्रकाश ( प्रकरणें ) खर्च केले. हें विवेचन त्याला व्याकरणशास्त्राच्या आधारें करावें लागलें. साहित्यशास्त्राच्या विवेचनांत हे व्याकरणांतील प्रकृतिप्रत्यय आणल्याबद्दल डॉ० राघवन् यांनी भोजाला अप्रत्यक्षपणें दोष दिला आहे. भोजावर व्याकरणशास्त्राचा, विशेषतः वाक्यपदीयाचा फार मोठा संस्कार झाला होता, त्यामुळे भोजानें एवढें विवेचन केलें, असें ते म्हणतात. हें त्यांचें म्हणणें मोठेसें समर्थनीय नाही. वाक्यपदीयाचा भोजावर संस्कार झाला होता हें कबूल; पण साहित्यशास्त्रीय ग्रंथांचा संस्कारहि त्यावर कमी नव्हता, ही गोष्ट त्याचे ग्रंथ वरवर चाळले असतांहि दिसते. आणि वाक्यपदीयाचा संस्कार तर अर्थ-ग्रहणाच्या दृष्टीनें अत्यावश्यच आहे. भोजाचाच ग्रंथ काय, पण काव्यशास्त्रावरील इतरहि ग्रंथ शिकतांना आणि शिकवितांना मध्येच कोठें व्याकरण आलें की आपण आज कंटाळतों. याला कारण आहे. ज्या काळांत हे ग्रंथ लिहिले गेले त्या काळापासून आपण आज इतके दूर गेलों आहोंत की त्या वेळच्या साहित्यिकांना दिसणाऱ्या शब्दार्थांतील लकबी आपल्याला आज समजेनाशा झाल्या आहेत, म्हणून आज आपण कंटाळतों. पण आज आपण शब्दार्थ-साहित्याचें विवेचन मराठी उदाहरणें घेऊनच केलें आणि मराठींतील विशिष्ट प्रत्यय, अव्ययें, रूपें, इत्यादि कोणत्या गोष्टी ध्वनित करतात हें पाहावयाचें ठरविलें तर आपल्यालाहि व्याक-रणाकडे धाव घेतल्याशिवाय चालणार नाही आणि त्यावरून सामान्य नियम काढूं म्हटलें तर मग आपल्यालाहि साहित्यशास्त्रांत मधूनमधून व्याकरण घालावेंच लागेल. असें न केलें तर, " यावयाचें होतें, " " यायचं होतं, " आणि " येवाव होत " या वाक्यार्थांनें एकच असलेल्या वाक्यांतील अभिप्राय आपल्याला स्पष्ट करतां यावयाचा नाही. ध्वन्यालोक, वक्रोक्तिजीवित किंवा शृंगारप्रकाश इत्यादि मूलग्राही ग्रंथांतील व्याकरणशास्त्रीय विवे-चनाचें साहित्यदृष्टीनें असें समर्थन करतां येतें.

आता कुंतकाच्या साहित्यविवेचनाकडे वळूं. भोज आणि कुंतक हे एकाच कालखंडां-तील आहेत, असें ढोबळ विधान करावयास हरकत नाही. या दोघांनीहि "साहित्य म्हणजे काय ?" असा स्पष्ट प्रश्न करून त्याचें विवेचन केलें. यापूर्वीच्या काव्यशास्त्रज्ञांनी केलें तें साहित्यविवेचनच होतें; पण "आम्ही करतों तें शब्दार्थसाहित्याचें विवेचनच आहे" असें त्यांनी केव्हाच म्हटलें नाही. कुंतकानें काव्याचें स्वरूप असें सांगितलें आहे—

शब्दार्थौ सहितौ वक्रकविव्यापारशालिनि ।
बन्धे व्यवस्थितौ काव्यं तद्विदाल्हादकारिणि ॥ (१।७)

—वैचित्र्यपूर्ण कविव्यापारानें शोभणाऱ्या आणि काव्यज्ञांना आल्हाद देणाऱ्या बंधांत साहित्यभावानें व्यवस्थित असलेल्या शब्दार्थांना काव्य संज्ञा आहे.

वाच्योऽर्थो वाचकः शब्दः प्रसिद्धमपि यद्यपि ।
तथापि काव्यमार्गेऽस्मिन् परमार्थोऽयमेतयोः ॥ (१।८)

—अर्थ वाच्य असतो व शब्द वाचक असतो हें प्रसिद्ध असलें तरी या काव्यमार्गात यांचा परमार्थ असतो.

"हें साहित्य म्हणून जें म्हटलें जातें त्यांत खरोखर कविकौशल्याची पराकाष्ठा दिसून येते. पण साहित्याचा खरोखर हा परमार्थ आहे असें आजपर्यंत कोणीहि सांगितलें नाही. तो साहित्याचा परमार्थ कोणता हें आम्ही आज सहृदयांना सांगतों."[४४]

शब्दार्थौ सहितावेव प्रतीतौ स्फुरतो यदा ।
सहिताविति तावेव किमपूर्वं विधीयते।। (१।१६)

मनुष्याच्या प्रतीतींत शब्दार्थ हे नेहमीच बरोबर स्फुरतात. असें असतांना काव्यांत शब्दांचें साहित्य असतें यांत अपूर्व असें काय सांगितलें !—शब्दार्थांचा साहित्यविरह कधीहि नसतो हें खरें; पण या काव्यमार्गामध्ये विशिष्ट प्रकारचें साहित्य अभिप्रेत आहे असें कुंतक म्हणतो.[४५]

शब्दार्थांच्या या विशिष्ट साहित्याची कल्पना देतांना तो म्हणतो—

समसर्वगुणौ सन्तौ सुहृदाविव संगतौ ।
परस्परस्य शोभायै शब्दार्थौ भवतो यथा ।।

समान गुणांचे मित्र एकत्र आले म्हणजे जशी परस्परांची शोभा वाढवितात त्याचप्रमाणे हे शब्दार्थ परस्परांना रमणीय बनवतात. यांची एकात्मता इतकी विलक्षण असते की एकाशिवाय दुसरा राहूंच शकत नाही. अर्थ रमणीय आहे पण तद्वाचक शब्द योग्य नसेल तर ती कल्पना मृतकल्पच होय; आणि शब्द चांगला असूनहि जर तो नीटपणें अर्थप्रतीति करीत नसेल किंवा इष्ट अर्थाहून वेगळाच अर्थ त्यांतून प्रतीत होत असेल तर तो शब्द व्याधिभूतच होयें[६]. शब्द व त्यांतून प्रतीत होणारा अर्थ यांच्यांतील रमणीयताद्योतक सुसंवादित्व हा साहित्याचा येथे अर्थ झाला.

साहित्याचा दुसरा प्रकार म्हणजे काव्यांतील एका शब्दाचा दुसऱ्या शब्दाशीं व एका अर्थाचा दुसऱ्या अर्थाशीं असणारा संवाद. पहिल्यांत शब्दार्थसंवाद आहे, तर दुसऱ्यांत शब्दविशेषांचा परस्पर, तसाच अर्थविशेषांचा परस्पर संवाद आहे. साहित्य म्हणजे शब्दार्थांची अन्यूनतेने आणि अनतिरिक्तत्वाने अवस्थिति. कुंतकाच्या शब्दांतच तिची कल्पना देणें अधिक चांगलें होईल.

---

४४. "यदिदं साहित्यं नाम, तदेतावति निःसीमनि समयाध्वनि साहित्यशब्दमात्रेण प्रसिद्धम् । न पुनरेतस्य कविकर्मकौशलकाष्ठाधिरूढ रमणीयस्य अद्यापि काश्चिद् विपश्चिद् अयमस्य परमार्थः इति मनाङ्मात्रमपि विचारपदमवतीर्णः । तदद्य सरस्वतीहृदयारविंदमकरंदबिंदुसंदोहसुंदराणां सत्कविवचसां अंतरामोदमनोहरत्वेन परिस्फुरदेतत् सहृदयषट्चरणगोचरतां नीयते ।"

४५. ननु च वाच्यवाचकसंबंधस्य विद्यमानत्वात् एतयोर्न कथंचिदपि साहित्यविरहः सत्यमेतत् । किंतु विशिष्टमेवेह साहित्यमभिप्रेतम् ।

४६. परमार्थतः पुनः उभयोरपि एकतरस्य साहित्यविरहः अन्यतरस्यापि पर्यवस्यति । तथा च अर्थः समर्थवाचकासद्भावे स्वात्मना स्फुरन्नपि मृतकल्पएव अवतिष्ठते । शब्दोऽपि वाक्योपयोगिवाच्यासंभवे वाच्यांतरवाचकः सन् वाक्यस्य व्याधिभूतः प्रतिभाति ।

साहित्यमनयोः शोभाशालितां प्रति काप्यसौ ।
अन्यूनानतिरिक्तत्वमनोहारिण्यवस्थितिः ॥ १।१७

सहितयोर्भावः साहित्यम् । अनयोः शब्दार्थयोः या कापि अलौकिकी चेतनचमत्कारकारितायाः कारणम् अवस्थितिः, विचित्रा एव विन्यासभङ्गी । कीदृशी अन्यूनातिरिक्तत्वमनोहारिणी, परस्परस्पर्धित्वरमणीया । यस्यां द्वयोः एकतरस्यापि न्यूनत्वं निकर्षो न विद्यते, नापि अतिरिक्तत्वम् उत्कर्षो वा अस्ति इत्यर्थः । ननु तयोः तथाविधं साम्यं द्वयोः उपहतयोः अपि संभवति इत्याह—शोभाशालितां प्रति । शोभा सौंदर्यमुच्यते । तया शालते श्लाघते यः, स शोभाशाली, तस्य भावः शोभाशालिता, तां प्रति सौंदर्यश्लाघितां प्रति इत्यर्थः । सैवच सहृदयाल्हादकारिता । तस्यां स्पर्धित्वेन या असौ अवस्थितिः परस्परसाम्यसुभगं अवस्थानम् सा साहित्यमुच्यते ।

अशा प्रकारें कुंतक साहित्याची कल्पना देतो. साहित्य म्हणजे शब्दार्थांचें, शब्दाशब्दांचें, तसेंच अर्थाअर्थांचें, सौंदर्यकारी, परस्परसाम्यसुभग अवस्थान. काव्यांतील शब्दार्थांची परस्परांना खुलविण्यांत जणू कांही स्पर्धा चाललेली असते. परिकर श्लोकांमध्ये कुंतकाने ही कल्पना एकत्र मांडली आहे.

" मार्गानुगुण्यसुभगः माधुर्यादिगुणोदयः ।
अलंकरणविन्यासः वक्रतातिशयान्वितः ॥
वृत्त्यौचित्यमनोहारि रसानां परिपोषणम् ।
स्पर्धया विद्यते यत्र यथास्वमुभयोरपि ॥
सा काप्यवस्थितिः तद्विदानन्दस्पन्दसुंदरा ।
पदादिवाक्परिस्पंदसारः साहित्यमुच्यते ॥

—मार्गाला ( रीतीला ) उचित अशा प्रकारचा माधुर्यादि गुणांचा उदय, वक्रतेचा ( वैचित्र्याचा ) अतिशय द्योतित करणारा अलंकारविन्यास, आणि वृत्तींच्या औचित्याने रसपरिपोष या गोष्टी ज्यांत आपापल्यापरीं स्पर्धेने चाललेल्या दिसतात, अशा प्रकारची रसिकांच्या मनांत आनंद निर्माण करणारी शब्दार्थांची अवस्थिति म्हणजे साहित्य होय. हीच कल्पना आणखी थोडक्यांत पण स्पष्टपणें त्याने दुसरीकडे मांडलेली आहे. काव्यांतील साहित्य विशिष्ट प्रकारचें असतें हें सांगतांना तो म्हणतो—

" किन्तु विशिष्टमेवेह साहित्यम् अभिप्रेतम् । कीदृशम् ?
वक्रताविचित्रगुणालंकारसंपदां परस्परस्पर्धाधिरोहः ।

काव्यांत शब्दार्थांचें असें साहित्य आहे किंवा नाही हें ठरविण्याचा निकष म्हणजे सहृदय होय. आणि शब्दार्थांतून रसास्वाद निर्माण होतो किंवा नाही हें पाहाणें हा त्या परीक्षेचा मार्ग होय. जेथे एखाद्या कल्पनेच्या किंवा अलंकाराच्या आहारीं जाऊन कवि रसभंग करतो तेथे साहित्यविरह घडतो. काव्यांत अलंकार सहजसुंदर असले पाहिजेत. प्रयत्नपूर्वक अलंकारविन्यास केल्यास शब्दसौंदर्य वाढविण्याच्या भरांत रसास्वादास बाध आल्याने साहित्यविरह होईल. अलंकारांच्या आहारीं जाऊन प्रयत्नपूर्वक शब्दार्थ अलंकृत करणाऱ्या कवींना उद्देशून कुंतक म्हणतो—

" व्यसनितया प्रयत्नविरचने हि, प्रस्तुतौचित्यपरिहाणेः वाच्यवाचकयोः परस्परस्पर्धित्वलक्षणसाहित्यविरहः पर्यवस्यति । "

कुंतकाचें हें साहित्यविवेचन पाहिलें म्हणजे आपण औचित्यविचाराच्या जवळ येतों. प्रस्तुतौचित्यहानीमुळे साहित्याविरह होतो, असें कुंतकानें स्वतःच सांगितलें आहे. यांतील 'प्रस्तुत' हा शब्द रसनिदर्शक आहे. काव्यांत रसोचित शब्दार्थसंदर्भ नसला की साहित्यविरह झालाच. सारांश, शब्दार्थसाहित्य रसोचित शब्दार्थ–साहित्य–विन्यासांत आहे. कुंतकानें साहित्यलक्षण सांगतांना " परस्परसाम्यसुभगअवस्थान " असे शब्द वापरले; भोज व्याकरिताच " सम्यक् प्रयोग " असा प्रयोग करतो; आणि राजशेखर " शब्दार्थांचा यथावत् सहभाव म्हणजे साहित्य " असें म्हणतो. या सर्वांचा इत्यर्थ, उचितशब्दार्थसन्निवेश असाच आहे. शब्दार्थांचें हें औचित्य रससाक्षेप असतें. रस हा काव्यात्मा आहे हें सर्वांनाच संमत आहे. तेव्हा रसाच्या अपेक्षेने शब्दार्थसंनिवेश हेंच शब्दार्थसाहित्य आणि औचित्य या दोघांचेंहि स्वरूप आहे. रसोचित शब्दार्थांचा संनिवेश करणें हेंच कवीचें मुख्य कर्म आहे असें ध्वनिकारहि सांगतो––

वाच्यानां वाचकानां च यदौचित्येन योजनम् ।
रसादिविषयेणैतत् मुख्यं कर्म महाकवेः ।। ( ध्वन्या० ३।३२ )

तर औचित्य हें रसपरिपोषाचें एकमेव रहस्य आहे असें आनंदवर्धन म्हणतो.

अनौचित्यादृते नान्यद् रसभंगस्य कारणम् ।
प्रसिद्धौचित्यबंधस्तु रसस्योपनिषद् परा ।।

सारांश, काव्यांतील शब्दार्थसाहित्य हें रसोचित शब्दार्थसन्निवेशांत प्रतिष्ठित असतें.[४७] म्हणूनच " रसोचित शब्दार्थसूक्तिनिबंधन म्हणजे काव्यपाक होय असें अवंतिसुंदरी व राजशेखर म्हणतात.[४८]

कुंतकाचें साहित्यविवेचन कविव्यापारमुखानें केलेलें आहे. कवीनें केलेल्या रसोचित शब्दविन्यासालाच कुंतक कविव्यापारवक्रत्व म्हणतो. या कविव्यापारांतील कौशल्याचें विवेचन कुंतकानें आपल्या ग्रंथांत द्वितीय उन्मेषापासून केलें आहे. भट्टनायकाचें काव्यविवेचन काव्यापासून रसास्वाद कसा मिळतो या दृष्टीनें केलें आहे, म्हणून त्याचें विवेचन रसिकव्यापार मुखानें केलें आहे असें म्हणतां येतें. म्हणूनच कुंतक व भट्टनायक यांनी शब्दार्थवैशिष्ट्याचें विवेचन व्यापारमुखानें केलें आहे, असें समुद्रबंध म्हणतो.

काव्यशास्त्रांतील प्रसिद्ध ग्रंथकारांनी केलेल्या साहित्यविवेचनाचें दिग्दर्शन संपलें. आता यांतून फलितार्थ कोणता निघतो तें पाहूं या. शब्दार्थसाहित्य म्हणजे वाच्यवाचकसंबंध. हा शास्त्र आणि काव्य यांच्यांत सारखाच असतो. त्यामुळे शब्दव्युत्पत्ति हीच कवित्वाकरिता पुरेशी आहे. रूपकादि अलंकार बाह्य होत, असें मंगलाचें मत आणि शब्दार्थांच्या साहित्याचें काव्यांतील स्वरूप वक्रोक्तिमय असतें म्हणून रूपकादि अलंकार काव्याचें आवश्यक अंग आहे हें भामहाचें मत, या वादांतून साहित्यचर्चेस तोंड लागलें. काव्यांतील व्यवहार गुणवृत्तीचा असतो असे उद्भटानें सांगितलें; तर शब्दार्थसाहित्य गुणांवर अधिष्ठित आहे असें वामन म्हणाला. शब्दव्युत्पत्तिवादी व वक्रोक्तिवादी यांच्या वादांतील सुवर्णमध्य वामनानें साधला.

---

४७. औचित्यदृष्टीनें शब्दार्थसाहित्यविचार क्षेमेंद्रानें " औचित्यविचारचर्चा " या ग्रंथांत केलेला आहे. त्याचें दिग्दर्शन मीं " संस्कृत साहित्यशास्त्रांतील औचित्य विचार" ( युगवाणी १९४७ ) या लेखांत केलें आहे.

४८. काव्यमीमांसा, पान ३०.

ध्वनिकार, आनंदवर्धन व अभिनवगुप्त यांनी रस, रसाभिव्यक्ति करणारा व्यंजनाव्यापार, व रसोचित गुणालंकारनिवेश या दृष्टीने साहित्याचें विवेचन करून शास्त्राची पुनर्व्यवस्था केली. राजशेखर, भट्टनायक, कुंतक, भोज यांनी रसास्वाद व रसपरिपोष या दृष्टीने शब्दार्थसाहित्याचें विवेचन केलें; आणि अखेर मम्मटाने साहित्यशास्त्रविवेचनाचें स्वरूप व पद्धति ठरविली. मम्मटाची ही पद्धतीच पुढील ग्रंथकारांनी उचलली. साहित्यशास्त्राच्या विकासाचे ऐतिहासिक दृष्टीने हे टप्पे आहेत.

शास्त्रदृष्टीने या साहित्यविवेचनाचे तीन विभाग दिसतात. शब्दार्थसाहित्याचें धर्ममुखाने विवेचन, व्यंग्यमुखाने विवेचन, आणि व्यापारमुखाने विवेचन. पैकी धर्ममुखाने उद्भट आणि वामन यांनी विवेचन केलें; व्यंग्यमुखाने आनंदवर्धनाने विवेचन केलें; आणि व्यापारमुखाने भट्टनायक व कुंतक यांनी विवेचन केलें. आणि हा विभाग शास्त्रदृष्टीने उपपन्नहि होतो. काव्य ही एक शब्दार्थमय वस्तु आहे. तिचें प्रयोजन रसास्वाद हें आहे. त्या वस्तूची निर्मिति कवि करतो आणि तिचा आस्वाद रसिक घेतो, ही वस्तुस्थिति आहे. या दृष्टीने वरील तीन विभाग उपपन्न होतात. रसास्वादाला योग्य होण्याच्या दृष्टीने काव्यवस्तूच्या ठिकाणीं कोणते धर्म पाहिजेत हें धर्ममुखाने विवेचन. काव्य रसपर्यवसायी असतें म्हणजे काय आणि रसपर्यवसानाच्या दृष्टीने काव्यांगाची व्यवस्था कशी असावयास पाहिजे हें फलमुखाने किंवा व्यंग्यमुखाने विवेचन. व्यापारमुखाने म्हणजे कविव्यापार व रसिकव्यापारमुखाने विवेचन. पैकी कविव्यापारदृष्टीने कुंतक व रसिकव्यापारदृष्टीने भट्टनायक यांचें विवेचन आहे. अनुमानवादी महिमभट्ट व तात्पर्यवादी लोल्लट–धनिक यांचें विवेचनहि व्यापारमुखाने आहे. पण रसास्वादाच्या दृष्टीने तें पूर्ण नसल्याने लंगडें पडलें व परास्त झालें. भट्टनायकाच्या भोगीकरण व्यापारांत व्यंजनावृत्तीचाच कसा खेळ आहे, हें अभिनवगुप्ताने दाखवून दिलें,[४९] आणि मीमांसकांची व्यवहारांत तात्पर्यवृत्ति हीच काव्यांत ध्वनि आहे असा समन्वय भोजाने केला.[५०] अखेर हें साहित्यविवेचन ध्वनीच्या आश्रयानेच होऊं लागलें व साहित्यशास्त्राला एक पद्धति आली.

धर्म, व्यंग्य आणि व्यापार या दृष्टींनी केलेल्या विवेचनांचा परस्परसंबंध कसा आहे हें आपण आता पाहूं. हें पाहिलें म्हणजे या विवेचनास पूर्णता येईल. रस आणि काव्यांतील शब्दार्थ यांचा व्यंग्यव्यंजक संबंध आहे. रसमुखाने केलेलें विवेचन हें काव्यांतून अखेर काय व्यक्त होतें या दृष्टीने केलेलें विवेचन होय. धर्ममुखाने केलेलें विवेचन हें कोणत्या विशिष्ट प्रकारच्या शब्दार्थसाहित्यांतून रस व्यक्त होतो याचें विवेचन आहे. आणि व्यापार मुखाने केलेलें विवेचन म्हणजे रस कसा व्यक्त होतो याचें विवेचन आहे.

काव्यांतून कवि रस कसा व्यक्त करतो हें कुंतक सांगतो; तर रसिक काव्यांतून रसास्वाद कसा घेतो हें भट्टनायक सांगतो. असा या दोघांच्या विवेचनांतील फरक आहे. यामुळे कुंतकाचें विवेचन धर्ममुखाला जवळचें ठरतें, तर भट्टनायकाचें विवेचन रसमुखाकडे झुकतें. याचा अर्थ असा नाही की, कुंतकाने रसास्वादाकडे किंवा भट्टनायकाने गुणालं-

---

४९. तथाहि अभिधा भावनारसचर्वणात्मकेऽपि त्र्यंशे काव्ये रसचर्वणा तावज्जीवितभूता इति भवतोऽप्यविवादोऽस्ति।...व्यापारोहि यदि ध्वननात्मा रसनास्वभावः तन्नापूर्वमुक्तम्।
...लोचनटीका.

५०. तात्पर्यमेव वचसि ध्वनिरेव काव्ये।...शृंगारप्रकाश.

कारांकडे लक्षच दिलें नाही. काव्याचें आणि म्हणून कविव्यापाराचें पर्यवसान अखेर रसिकाच्या रसास्वादांतच झालें पाहिजे ही गोष्ट कुंतक पुढील अंतरश्लोकांत सुचवितो.

वाच्यावबोधनिष्पत्तौ पदवाक्यार्थवर्जितम् ।
यत् किमप्यर्पयन्त्यन्तः पानकास्वादवत् सताम् ॥
शरीरं जीवितेनेव स्फुरितेनेव जीवितम् ।
विना निर्जीवतां येन वाक्यं याति विपश्चिताम् ॥
यास्मात् किमपि सौभाग्यं तद्विदामेव गोचरम् ।
सरस्वती समभ्येति तदिदानीं विचार्यते ॥

—"काव्यांतील वाच्यार्थ कळल्यावर, पदवाक्यार्थांना सोडून वेगळें पानकास्वादाप्रमाणे आस्वादरूप जें कांही रसिकांच्या अंतर्वृत्तींत अर्पित केलें जातें; जीविताशिवाय शरीर, किंवा स्फुरणाशिवाय जीवित, त्याप्रमाणे ज्यावांचून रसिकांना शब्दार्थमयवाक्य निर्जीव वाटतें; व ज्यापासून रसिकांना अवर्णनीय सुखाचा अनुभव येतो, त्या गोष्टीप्रत कविवाणी कशी पोंचते याचा आता विचार करूं." यांत कविवाणीचें पर्यवसान रसास्वादांत होतें इतकेंच नव्हे तर रसास्वाद हा कविवचनाचा जीवितभूत आहे, त्याशिवाय कविवाक्य निर्जीव ठरतें, असें कुंतक सांगतो. आणि ही गोष्ट या श्लोकांतील शब्दांचें ध्वनिकारिकांतील कारिकांशीं दिसणारें साम्य व पानकरसाच्या दृष्टान्ताचें साम्य पाहिलें म्हणजे या म्हणण्याला अधिक बळकटी येते.

भट्टनायकाचा हृदयदर्पण ग्रंथ उपलब्ध नसल्याने रसास्वादाच्या दृष्टीने त्याने काव्यगत गुणालंकारांचें विवेचन कसें केलें असेल हें स्पष्टपणें सांगतां येत नाही. पण तसें विवेचन त्याने केलें असलें पाहिजे असें अभिनवगुप्ताच्या लोचन आणि अभिनवभारतींतील कांही निर्देशांवरून निश्चितपणें म्हणतां येतें. भट्टनायकाने अभिधा, भावना आणि भोग किंवा भोगीकृति हे त्रिविध व्यापार सांगितले. पैकी अभिधा वाच्यवाचकरूप असल्याने शास्त्र व काव्य यांना समान आहे. भोगीकृति ही रसचर्वणाच आहे. पण भावना हा जो मधला व्यापार तो काव्यापुरता, गुणालंकाररूप शब्दार्थसौंदर्यालाच धरून आहे असें अभिनवगुप्त लोचनांत म्हणतो.[५१] इतकेंच नव्हे तर "काव्यामध्येसुद्धा रसचर्वणा गुणालंकारांच्या सौंदर्यातिशयामुळें होत असते असें दुसरेहि म्हणतात" असें वाक्य भट्टनायकाला उद्देशून अभिनवगुप्ताने लिहिलें आहे.[५२] यावरून भट्टनायकाने आपल्या ग्रंथांत रसास्वादाचें स्वरूप सांगतांना भावकत्वाच्या विवेचनांत काव्यगत गुणालंकारांची दखल घेतली होती असें म्हणावयास हरकत राहात नाही.

शब्दार्थमय काव्यांत कोणते धर्म असतात, काव्याचें पर्यवसान कशांत होतें, काव्यांतून प्रतीत होणाऱ्या रसाचें स्वरूप कसें असतें, कवि काव्य लिहितो म्हणजे काय करतो, रसिक रसास्वाद घेतो म्हणजे काय करतो, या सर्व गोष्टींचें विवेचन काव्यशास्त्रावरील संस्कृत ग्रंथांत कसें झालें आहे याची स्थूल कल्पना वरील विवेचनावरून येईल. कवीच्या काव्यांतून कविस्वभाव कसा द्योतित होतो हें मीं "वैदर्भी रीती" वरील निबंधांत दाखविलें आहे. या सर्व गोष्टी विचारांत घेतल्या म्हणजे साहित्याचें सर्व बाजूंनी विवेचन संस्कृत ग्रंथकारांनीहि त्यांच्या

५१. भावकत्वमपि समुचितगुणालंकारपरिग्रहात्मकं अस्माभिरेव वितत्य वक्ष्यते । —लोचन

५२. अन्ये तु काव्येऽपि गुणालंकारसौंदर्यातिशयकृतं रसचर्वणमाहुः ।—अभिनव भारती. (गायकवाड प्रत) पान २९२.

शक्तिप्रमाणे कसें केलें हें लक्षांत येईल. साहित्यशास्त्राचें संस्कृतांतील विवेचन केवळ रसिक दृष्टीने आहे असें कित्येक म्हणतांना आढळतात; तर त्यांत केवळ गुणालंकारांवर भर दिला आहे असें दुसरे म्हणतात; कविव्यापाराच्या दृष्टीने त्यांत विवेचन नाही असाहि कित्येकांचा ग्रह आहे. अशीं विधानें एकांगी कशीं आहेत हेंहि आता लक्षांत यावयास हरकत नाही.

संस्कृतांतील साहित्यविवेचनपद्धति आणि आजची टीकाशास्त्राची विवेचनपद्धति यांच्यांत फरक आहे. संस्कृतांतील विवेचन हें त्या ग्रंथकारांच्याच पद्धतीने वाचावें लागतें. तें आज सर्वांना जमत नाही. संस्कृतांतील साहित्यविवेचनांतील तत्त्वांचें, मतांचें आणि वादांचें वर्गीकरण करून त्यांचें आजच्या पद्धतीने पुनर्लेखन केलें तर त्यांचें संपूर्ण स्वरूप आजच्या वाचकाच्या लक्षांत येण्यास मदत होईल व आजच्या टीकाशास्त्रासहि त्याची मदत मिळेल. पण हें काम लहान नाही. एकट्यादुकट्याकडून होणें तें शक्यहि नाही. एखाद्या संस्थेनेच हें काम हातीं घेतलें तर तें शक्य आहे. आणि मराठीच्या प्रांतांत महाराष्ट्र साहित्य परिषद् आणि विदर्भ साहित्य संघ या दोनच संस्था हें काम अंगावर घेण्यास समर्थ आहेत.

---

## परिशिष्ट

संस्कृतांतील कांही काव्यलक्षणें—

१. भामह— शब्दार्थौ सहितौ काव्यम्

२. वामन— काव्यशब्दोऽयं गुणालंकारसंस्कृतयोः शब्दार्थयोः
वर्तते । ...रीतिरात्मा काव्यस्य ।

३. रुद्रट— ननु शब्दार्थौ काव्यम् ।

४. कुंतक— शब्दार्थौ सहितौ वक्रकविव्यापारशालिनि ।
बन्धे व्यवस्थितौ काव्यं तद्विदाह्लादकारिणि ॥

५. राजशेखर— शब्दार्थौ ते शरीरम् । रस आत्मा ।
गुणवदलंकृतं च वाक्यमेव काव्यम् ।

६. वाग्भट— साधु शब्दार्थसंदर्भं गुणालंकारभूषितम् ।
स्फुटरीतिरसोपेतं काव्यं कुर्वीत कीर्तये ॥

७. मम्मट— तददोषौ शब्दार्थौ सगुणावनलंकृती पुनः क्वापि ।

८. हेमचंद्र— अदोषौ सगुणौ सालंकारौच शब्दार्थौ काव्यम् ।

९. जयदेव— अंगीकरोति यः काव्यं शब्दार्थावनलंकृती ।
असौ न मन्यते कस्मादनुष्णमनलं कृती ॥

१०. विद्यानाथ— गुणालंकारसहितौ शब्दार्थौ दोषवर्जितौ ।
गद्यपद्योभयमयं काव्यं काव्यविदो विदुः ॥

---

## ' आरती ' चें छंदःस्वरूप

ना. ग. जोशी

' आरती ' या भक्तिपर गीतप्रकारामध्ये कोणता छंद असतो याबद्दल बराच मतभेद आढळतो. आरत्या अनेक छंदांत आहेत. त्यांपैकीं बहुसंख्य आरत्या ' युगें अठ्ठावीस ' वगैरे विठ्ठलाच्या आरतीसारख्या असतात. या छोट्या लेखांत याच प्रकारच्या आरत्यांचा विचार मुख्यतः केलेला आहे. बाकीच्या प्रकारांचा उल्लेख अखेरीस सूत्ररूपाने केला आहे.

' परिलीना ' प्रकारच्या आरत्या : या प्रकारच्या आरत्यांसंबंधी आपलें मत कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांनी ' पद्य-प्रकाश ' नामक आपल्या लहान पुस्तकांत पुढीलप्रमाणे व्यक्त केलें आहेः

> " आवर्तन हें आठाहून अधिक मात्रांचें बहुशः आढळत नाहीं. आरतीचा एक प्रकार मात्र अपवादरूप वाटतो. या प्रकारांत चरणाचे, १२ मात्रांचा पहिला आणि १० मात्रांचा दुसरा असे दोन तुकडे पडतात. म्हणण्याची जी पद्धत रूढ आहे ती पाहतां पहिल्या १२ मात्रांच्या तुकड्याच्या अन्तीं यति आहे, पण कांहीं मात्रांचा असा विराम नाहीं, मात्र चरणांतीं २ मात्रांचा विराम आहे. या दोन्ही तुकड्यांच्या आरंभीं टाळी आहे. पहिल्या तुकड्यांतील मात्रांची रचना [ । प, – – ] अशी दिसते आणि दुसऱ्या तुकड्यांतील मात्रांची रचना [ । प, + ] अशी दिसते. "
> ' पद्यप्रकाश ' पृ. ६४-६५.

आणि त्यांनी उदाहरणार्थ ' युगें अठ्ठावीस ', ' सुखकर्ता दुखहर्ता ', आणि ' दुर्गे दुर्घट भारी ' या आरत्यांचा उल्लेख केला आहे.

परंतु ' पद्यप्रकाशांत ' आरतीच्या चरणाचे जे दोन तुकडे अनुक्रमें १२ व १० मात्रांचे उल्लेखिले आहेत, त्यांबद्दल मतभेद संभवत नसला तरी त्या तुकड्यांचें नियमन जें ' प ' म्हणजे अष्टमात्रक पद्मावर्तन मानून केलें आहे तें बरोबर वाटत नाहीं. या प्रकारची आरती षण्मात्रक तालांत म्हटली जाते आणि त्यामुळे पहिल्या १२ मात्रांच्या तुकड्याचे दोन ६ मात्रांचे गट म्हणजेच दोन भृंगावर्तनें होतात व पुढल्या १० मात्रांच्या तुकड्याचे १ भृंगावर्तन व ४ मात्रांचा एक गट असे पोटगट पडतात. याचाच अर्थ असा कीं,

> —या ' युगें अठ्ठावीस ' प्रकारची आरती ' छंदोरचना 'न्तर्गत ' परिलीना ' जातीची असते. ( । भृ । भृ । भृ ।– + ऽऽ । ). ती षण्मात्रक तालांतील भृंगावर्तनी गेय रचना असते. पद्मावर्तनाची मोडणी येथे लागूं पडत नाहीं. दुसऱ्या प्रकारच्या आरत्या पद्मावर्तनी वर्गांत पडतात. त्यांचा उल्लेख लेखाच्या शेवटीं केलेला आहे.

या 'परिलीना' प्रकारच्या आरत्यांपैकी कांहींची पद्मावर्तनी मोडणी पुढीलप्रमाणे होईल.

| | | | |
|---|---|---|---|
| युगें अठ्ठा | । वीसऽ ऽ | । विटेवरी उ | । भा ॥ |
| सुख कर्ता दुख | । हर्ता | । वार्ता विघ्ना | । ची ॥ |
| दुर्गे दुर्घट | । भारी | । तुजविण संसा | । रीं ॥ |

आता दुसऱ्या आवर्तनांत ४ मात्रांच्या कालाचीं अक्षरें आहेत. आणि आवर्तन तर पुरें झालें पाहिजे, म्हणजे आणखी ४ मात्रांचा विराम किंवा प्लुति तेथे मानावी लागते. पण ‘ पद्यप्रकाश ’कर्ते तर सांगतात की, तेथे मात्र “ यति आहे, कांही मात्रांचा असा विराम नाही. ” यावरून ही पद्मावर्तनी मोडणी बरोबर नाही असें आढळतें. प्रत्यक्ष रूढ म्हणणी करून टाळी वाजविली तर पहिली टाळी अनुक्रमें ‘ यु ’ ‘ सु ’ व ‘ दु ’ यांवर पडते. पद्मावर्तनी मोडणी असेल तर दुसरी टाळी ‘ वी ’, ‘ ह ’ व ‘ भा ’ यांवर पडावयास पाहिजे, पण प्रत्यक्ष वाजवतांना ती अनुक्रमें ‘ ठा ’, ‘ दु ’ आणि ‘ घ ’ वर पडते. या दोन टाळ्यांमधील अक्षर-मात्रा ६ आहेत हें सहज कळेल व त्यावरून ही रचना षण्मात्रक भृंगावर्तनी आहे असें म्हणावें लागेल.

या आरत्या पद्मावर्तनी नसून भृंगावर्तनी आहेत हें थोड्या अधिक पृथक्करणाने जास्तच स्पष्ट होतें:

( १ ) या तऱ्हेच्या आरत्यांतील कित्येक ओळींचें विभाजन पद्मावर्तनी पद्धतीने, ‘ पद्यप्रकाश ’ कर्ते म्हणतात तसें करणें कठिण जातें :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| हिरेजडित मु | । मुगुट, | । शोभतो ब | । रा | ( गणपतीची ) |
| व्याघ्रांबर फणि | । वरधर, | । सुंदर मदना | । री | ( शंकराची ) |
| करि डळमळ भू | । मंडळ, | । सिंधूजळ गग | । नीं | ( मारुतीची ) |
| चारी श्रमले | । परंतु, | । न बोलवे कां | । ही | ( देवीची ) |

तीच भृंगावर्तनी मोडणी सहज साधते :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ( मात्रिक-छांदस ) | हिरेजडि | । त मुगुट | । शोभतो | । बरा । |
| ( मात्रिक ) | व्याघ्रांबर | । फणिवरधर | । सुंदर मद | । नारी । |
| ,, | करि डळमळ | । भू मंडळ | । सिंधूजळ | । गगनीं । |
| ,, | चारी श्रम– | । ले परंतु | । न बोलवे | । कांही । |

( २ ) वरच्यांपैकी मधल्या दोहोंत आवर्तनान्तीं यमकें येतात तींहि भृंगावर्तनी रचनेचीं द्योतक ठरतात. या तऱ्हेचीं यमकित आवर्तनें आणखीहि कित्येक आढळतातः

| | | | | |
|---|---|---|---|---|
| जयदेव | । जयदेव | । ...... | | |
| सत्राणें | । उड्डाणें | । हुंकार वदनीं | । | ( मारुतीची ) |
| सुख कर्ता | । दुखहर्ता | । वार्ता विघ्नाची | । | ( गणपतीची ) |
| लंबोदर | । पीतांबर | । फणिवर बंधना | । | ( ,, ) |
| सुखकरिणी | । दुखहरिणी | । जननी वेदांची | । | ( गीतेची ) |
| पंचानन | । हयवाहन | । सुरभूषित लीळा | । | ( खंडोबाची ) |
| लवथवती | विक्राळा | । ब्रह्मांडीं माळा | । | ( शंकराची ) |
| कर्पूरगौर | भोळा | । नयनीं विशाळा | । | ( ,, ) |
| रत्नखचित | फरा | । तुज गौरीकुमरा | । | ( गणपतीची ) |

श्यामसुं दर गळां । वैजयंती माळा । (विष्णूची)
दुर्गे दु र्घट भारी । तुजविण संसारीं । (देवीची)

(३) याशिवाय विठ्ठलाच्या आरतीसारख्या आरत्यांत कांहीं आवर्तनांची पुनरुक्ति करण्यांत येते तीहि याचीच द्योतक आहे :

रखुमाईवल्लभा } पावें जिवलगा।
राहीच्या वल्लभा

अशा तऱ्हेच्या विश्लेषणामुळे या आरत्या पद्मावर्तनी नसून भृंगावर्तनीच आहेत हें मत दृढ होतें. 'दुर्गे दुर्घट भारी०' ही पूर्णपणें मात्रावर्तनी आहे. परंतु गणपतीची व विठ्ठलाची आरती (वर उल्लेखिलेली) यांमध्ये मधूनमधून छांदस म्हणजे विलंबितोच्चारी अक्षररचनाहि आढळून येते; कारण त्या अक्षरांची जागाच अशी आहे की छंदोदृष्ट्या तेथे द्विमात्रक अक्षर पाहिजे असूनही लघु अक्षर आलेलें असतें आणि त्यामुळे तें लघु अक्षर विलंबित किंवा दीर्घ उच्चाराने म्हणावें लागतें. 'छंदोरचने'त 'छंद' म्हणून नवीन वर्गीकरण केलेल्या 'छांदस' रचनेंत ऱ्हस्वाचें द्विमात्रक किंवा दीर्घ होतें या पटवर्धनी सिद्धांताचा हाहि एक पुरावाच आहे. शुद्ध मात्रिक आणि मिश्र मात्रिक-छांदस अशा दोन्हीं रचनांचीं उदाहरणें पुढे दिलीं आहेत :

परिलीना : । भृ । भृ । भृ । – +
मात्रिक : दुर्गे दु । र्घट भारी । तुजविण सं । सारीं
अनाथना । थे अंबे । करुणा वि । स्तारी ।। (देवीची आरती)
छांदसमिश्र: चरणीं वा । हे भीमा । उद्धरी । जगा...
गरुड ह । नूमंत । पुढे उभे । राहती ।। (विठ्ठलाची आरती)
सर्वांगीं । सुन्दर । उटि शेंदु । राची
चंदना । चीं उटी । कुंकुम-के । शरा ।। (गणपतीची आरती)

अशीच मिश्र मात्रिक-छांदस रचना शंकराची, सद्‌गुरूची (१ ली), विष्णूची, व्यंकटेशाची, रामाची, भागवताची, गीतेची, दत्ताची व मारुतीची या आरत्यांतहि आढळते. वर दिलेल्या चरणांची रकानेवार तुलना एकाद्या दीर्घाक्षरप्राय चरणाशीं केल्यास लघूचें दीर्घ कसें करावें लागतें तें सहज लक्षांत येईल.

दीर्घाक्षरप्राय रचना : ओवाळूं । आरत्या । कुर्वंड्या । येती ।।
छांदस रचना गरू–ड ह । नू मं त । पुढे उभे । राहती ।।
सर्वांगीं । सुंदर । उटि शेंदू । राची ।।

या प्रकारच्या आरत्यांत कांहीं ठिकाणीं चरणमध्यावरील विरामाच्या ठिकाणीं द्विमात्रक प्लुति घेऊन म्हणणी करण्याची विशिष्ट लकब आहे तीहि पाहण्यासारखी आहे. त्यांपैकी कांहीं जागीं तर छंदोदृष्ट्याच मात्रा भरून काढावयाच्या असतात. विठ्ठलाच्या आरतींतील पुढील परिचित चरण पाहावा:

– – + ss –
दिंड्या प । ता का । वैष्णव ना च ती ।।

अनुक्रमणिका

या ओळींतहि छांदसमिश्र रचना आहे. दुसऱ्या आवर्तनांत दोन अक्षरांच्या ४ मात्रा होतात व राहिलेल्या २ मात्रा प्लुतीने भरून काढल्या जातात. या ठिकाणीं दुसरी वैकल्पिक मोडणी संभवनीय नाही.

कांही ठिकाणीं चरणमध्यावर प्लुत मात्रा ठेवून म्हणगी करण्याची परंपरा आहे. पण वैकल्पिक मोडणीने त्या प्लुतीची जरूर राहतहि नाही. उदा०, वरील विठ्ठलाच्या आरतींतलाच पुढील चरण पाहावा : रूढ म्हणणीप्रमाणे मोडणी अशी होईलः

– ⌣⌣ – – +ss ⌣⌣ –⌣ ⌣ – +
पुं ड लि का। भे टी । प र ब्र ह्म आ। लें गा

म्हणजे दुसऱ्या आवर्तनांत ' टी ' नंतर द्विमात्रक प्लुति येते. पण त्यामुळे तिसऱ्या आवर्तनांतील ' ब्र ' ह्या संयोगापूर्वीचा ' र ' गुरुत्व न पावतां उच्चारतः लघुच राहतो; आणि ' आलेगा ' मधील ' आ ' चा ' अ ' कार होतो. म्हणून रूढ म्हणणींत जरा फरक करून या राहिलेल्या दोन मात्रा प्लुतीच्या जागीं घेतां येतील.

– ⌣ ⌣ – – ⌣ ⌣ – –– – – +
पुं ड लि का । भे टि पर–। ब्रह्म आ । लें गा

किंवा आणखी पुढील रीतीनेहि ही प्लुति भरून काढणें शक्य आहे.

– – – – – – ⌣⌣ – ⌣ ⌣ – +
पुं ड ली। का भे टी। पर ब्रह्म आ । लें गा

पण त्यामुळे पहिल्या आवर्तनांत छांदस रचना येऊन तिसऱ्या आवर्तनांत निसरडे लघुप्रयास उच्चार, असें होईल. अशीच वैकल्पिक मोडणी पुढील चरणांतहि आढळते. रूढ म्हणणीप्रमाणे मोडणी अशी होईलः

– ⌣⌣ –+ ss – ⌣ – ⌣ – +
देवसुर ।वर । नित्य येति ।भेटी

प्लुतिरहित मोडणी पुढीलप्रमाणे विकल्पें शक्य होईल:

देवसु । रवर। नित्य येति । भेटी
देवसुर–। वर नि– । त्य येति । भेटी

या प्लुतिसहित मोडणीच्या जातीचा किंवा खंडित ' पारिलीने ' चा विचार ' छंदोरचनें ' त आलेला नाही. ' छंद ' वर्गात – – –। – – या मोडणीचा एक 'निर्झरगीत' 'छंद' आहे. त्याची द्विरुक्ति या चरणांत आहे. पण एकतर येथे केवळ छांदस रचना नसून मात्रिक-छांदस मिश्र रचना आहे, आणि दुसरें म्हणजे अखंड ' पारिलीने ' च्याच ओघांत एखादा खंडित चरण आलेला असल्यामुळे हें एक केवळ वैचित्र्य ( variation ) मानणें अधिक सयुक्तिक होईल. – – –। – + अशा मोडणीची मात्रिक जातिरचना अपभ्रंशांत क्वचित् आढळते. कदाचित् मुळांत ही रचना याच मोडणीची द्विपदी असेल व कालांतराने मधला खंड भरून मग त्याची अखंड जाति तयार झाली असेल. त्या जातीला आज ' परिलीना ' म्हणतातः

अनुक्रमणिका

रुढ बाल । कंदं
देव दाह । मंदं
सूर किरण । जारं ' महापुराण ,' संधि ७६।७
छड्डियाव । लेवो
इच्छियंधि। सेवो ' महापुराण ,' संधि १४।३

हा खंडित ' पारिलीने ' चा किंवा मात्रिक ' निर्झरगीता ' चा प्रकार वाटतो. पुढील रचनांत अखंड ' परिलीने ' चा भास होतो :

˘˘+
चउ विह दे । वणिकायहिं । जयजयका । रियउं
' महापुराण ' सं. ६५।८
दिक्खावणु । आवेप्पिणु । कात्तियमा- । सि पुणु ।
' महा०' सं. ६५।६

'विलंबित-गलितक' छंदासारख्या कांहीची मोडणी पद्मावर्तनीहि शक्य आहे. परंतु पुढील 'हेला' नामक अपभ्रंश छंदांतील रचना षण्मात्रक आवर्तनांची निश्चित आहे.

आरूढा । महासवार । वाहिया तु । रंगा
कंचण सा । रिसज्जया । चोइया म । यंगा ।। ' महा ' सं. ७२।८

' हेला ' ची मोडणी हेमचंद्राचार्यांनी ' छंदोनुशासनां ' त पुढील प्रमाणे दिली आहे :

षण्मात्रक : । भृ । लगाल + गा । + गा + लगाल + । गा + गा

याप्रमाणे ' परिलीना ' प्रकारच्या आरत्यांचा विचार झाला. आता, ' पद्यप्रकाश '-कारांना यांत पद्मावर्तनें आहेत असें कां वाटलें असावें ? याचा तलास करतां, -मी वर अपभ्रंशांतील ' विलंबित-गलितका ' चा उल्लेख करतांना जी शक्यता उल्लेखिली तीच कारण असावी. या षण्मात्रक ' परिलीना ' ची मोडणी कांही चरणांत अष्टमात्रक जातींप्रमाणेहि होऊं शकेल. डॉ. माधवराव पटवर्धनांचींच उदाहरणें घेऊं:

' चंद्रकांत ' संमिश्र :

सुखकर्ता । दुखहर्ता । वार्ता विघ्ना । ची ।।

' शुद्धसती–' ' पिशंग ' :

+ –
युगें अठ्ठा । वीस ऽऽ । विटे वरी उ । भा ।।

' शुभगंगा ' मात्रिक :

दुर्गे दुर्घट । भारी करुणा । विस्तारीऽऽ ।

म्हणजे ' पद्यप्रकाशां ' त सुचविलेल्या ' शुद्धसती '–'पिशंग' या संयुक्त रचनेप्रमाणेच इतरहि दिसतात. परंतु ही केवळ एक गृहीत शक्यता आहे. आरण जाति निश्चित करतांना रूढ म्हणणी पाहत असतां वरील आरत्यांची रूढ मोडणी षण्मात्रक तालांतील गीताची आहे हें सहज कळून येईल. त्यामुळे हा आरतीप्रकार षण्मात्रक ' परिलीने ' चाच मानावा लागतो, अष्टमात्रक आवर्तनांच्या रचनेचा नव्हे.

यापुढे आरत्यांच्या इतर प्रकारांचा उल्लेख तेवढाच करीत आहें:

**आरत्या प्रकार २ रा:** ‘ चंद्रकांत ’ - ‘पतितपावन’ जातींतील आरत्या. यांत श्रीकृष्णाच्या तीन आरत्या, सद्‌गुरूच्या आरत्या २–३, विष्णूची २ री आरती आणि रामदासांची आरती, वगैरे समाविष्ट होतात. येथेहि मात्रिक आणि मिश्र अशी दोन्ही प्रकारची रचना आढळते. रूढ मोडणी आणि संभवनीय मोडणी फक्त अष्टमात्रक आवर्तनांचीच आहे. यांतहि चरणमध्यावर क्वचित् एकमात्रक किंवा द्विमात्रक प्लुति, म्हणणींतील लकबींमुळे, घेतली जाते.

– +ऽ–⏑– – +
नवल होता । हे आरती । देवाधिदे । वा ( विष्णूची–२ )
– +ऽऽ – – +
कांकड आर । ती माझ्या । कृष्णसभागी । या ( कृष्णाची–१)
– – + ऽ ऽ – – +
सगुण आर । ती आता । निर्गुण ओवा । ळूं ( सद्‌गुरुची–३ )

पण येथे सुद्धा अन्य तऱ्हेने म्हणणी केल्यास प्लुति राहत नाही.

**आरत्या प्रकार ३ रा:** ‘ दीनवत्सल ’जातींतील आरत्या. यांत ज्ञानेश्वराची, एकनाथाची, नामदेवाची, तुकारामाची, रामदासाची, वगैरे आरत्या मोडतात :

आरतीऽऽ । ज्ञानराऽऽ । जाऽऽमहा । कैवल्यऽऽ । तेजाऽऽऽऽ ।। या तऱ्हेच्या मोडणीची जाति ‘ दीनवत्सल ’ ‘ छंदोरचनें ’त नमूद केलेली आहे.

**आरत्या प्रकार ४ था:** ‘ भुवनसुंदर ’जातींतील आरत्या. यांत हिंदुस्तानींतील ‘ आरती कुंजविहारीकी ’ या चालीची ‘ आरती भुवनसुंदराची ’ ही आरती मुख्यतः येते. याशिवाय ‘ आरती चंद्रशेखराची ’ ‘ आरती दत्तात्रयप्रभुची ’ आणि ‘ आरती शंभुनंदनाची ’ या तीन आरत्या याच चालीवर आहेत. जातिनाम ‘ भुवनसुंदर ’ हें या मुख्य आरतीवरूनच ‘ छंदोरचनें ’त दिलेलें आहे.

याप्रमाणे आरत्यांच्या मुख्य मुख्य प्रकारांचें विश्लेषण करतां येईल. याचा विस्तारपूर्वक विचार माझ्या ( पीएच्. डी. च्या ) प्रबंधांत केलेला आहे. आरत्यांचे उल्लेख सर्व परिचित ‘ भक्तिमार्गप्रदीपा ’तील आहेत. ‘ भुवनसुंदर ’ प्रकारांतील बाकीच्या आरत्या मात्र अन्यत्र पाहिल्या आहेत.

---

अनुक्रमणिका

# सावरगावांतील तीन शिलालेख

शं. गो. तुळपुळे
( पुणें विद्यापीठ )

**प्रास्ताविक—**

मराठवाड्यांतील सावरगाव हें गाव सोलापूरच्या उत्तरेस सुमारें चोवीस मैलांवर उस्मानाबाद जिल्ह्यांतील तुळजापूर तालुक्यांत आहे. सावरगावास जाण्याची पायवाट सोलापूर–तुळजापूर रस्त्यावरील चतुरगावापासून फुटते व तेथून तें अदमासें चार मैल लांब आहे. मोगलाईंत सावरगाव या नांवाचीं तीनचार गावें असल्याने नांवाचा घोटाळा होऊं नये म्हणून हें सावरगाव 'कांटी–सावरगाव' या नांवाने ओळखलें जातें. कांटी हें गाव सावरगावाच्या जवळच असून या दोन गावांचें मिळून हें जोडनांव बनलेलें दिसतें. महाराष्ट्रांतील पिंपळगाव, निंबगाव, जांबगाव, आंबेगाव, वडनेर, चिंचवड इत्यादि ग्रामनामें त्या त्या गावच्या वृक्षाविशेषावरून पडलेलीं आहेत. सावरगाव हें नांवहि तेथील सावरीच्या ( < सं. शाल्मली ) झाडांवरून पडलें असावें. महानुभावांच्या स्थानपोथींत ( –संपा. वि. भि. कोलते, इ. १९५१– ) प्राचीन महाराष्ट्रांतील अनेक लहानमोठ्या गावांचीं नांवें आढळतात; पण आश्चर्य हें की वरीलपैकी एकाहि सावरगावाचा उल्लेख स्थानपोथींत येत नाही. कांटी व तुळजापूर याहि गावांचे उल्लेख स्थानपोथींत नाहीत. या तिन्ही गावांत हेमाडपंती देवळांचे यादवकालीन अवशेष पहावयास मिळतात व त्यांवरून त्यांच्या प्राचीनत्वाविषयीं शंका उरत नाही. विशेषतः तुळजापूरची भवानी किंवा तुकाई हें दैवत अति प्राचीन असून रामदास तिचा उल्लेख रामवरदायिनी असा करतात. ' ऐसी हे तुळजा–भवानी । प्रसिद्ध रामवरदायिनी ' या त्यांच्या उद्गारांतून तिचें प्राचीनत्व सूचित होतें. रामदासांच्या पूर्वी एकनाथांनी आदिमायेवर रचिलेल्या सुप्रसिद्ध भारुडांतहि ' तुळजापूर लक्ष्मी, दार उघड बया ' याप्रमाणे तुळजापूरच्या तुकाईस आवाहन केल्याचें आढळतें. तात्पर्य, एकनाथांच्या पूर्वी चांगलीं दोन-तीनशें वर्षें तरी या दैवताची प्रसिद्धी असावी. अशा प्रकारचें प्राचीन आणि यादवकालीन अवशेषांनी समृद्ध असलेलें गाव चक्रधरांच्या भ्रमन्तींतून सुटावें व त्याचा उल्लेख स्थानपोथींत कोठेहि येऊं नये याचें आश्चर्य वाटतें. सावरगाव हें तुळजापुरापासून पांचसात मैलांवरच असल्याने चक्रधर तुळजापुरास गेलेले नसतील तर ते सावरगावींहि कधीं गेलेले नाहीत हें ओघानेच येतें. कारण तुळजापुराचें महत्व ऐतिहासिक व धार्मिक दृष्ट्या सावरगावाहून निःसंशय अधिक आहे. असो.

**प्राचीन अवशेष—**

प्राचीन मराठी शिलालेखांचे ठसे घेण्याच्या निमित्ताने इ. १९५० च्या डिसेंबरांत सावरगावास जाण्याचा योग आला तेव्हा हा गाव ऐतिहासिक अवशेषांनी समृद्ध असलेला दिसला. विशेषतः यादवकालांतील हेमाडपंती बांधकामाचे अनेक नमुने तेथे पडीक स्थितींत इतस्ततः विखुरलेले आढळून आले. गावासभोवती दगडमातीचा तट असून बाहेरील बाजूला दुरगाबी ( < सं. दुर्ग + गढी ) या नावाने ओळखली जाणारी ओसाड व पडीक जागा आहे. गावाच्या एकंदर स्वरूपावरून पाहतां एका काळीं ही एक गढी किंवा भुईकोट किल्ला



क्र. १ : कदंब मरड्देव याचा शके १०८६ तील लेख.



क्र. २ : कृष्णदेव याचा शके १२१५ मधील शिलालेख.

अनुक्रमणिका

असावा असें दिसतें. गावांत व गावाच्या आसपास कांही जुनीं देवळें भग्नावस्थेंत उभीं असून त्यांपैकी बहुतेक हेमाडपंती बांधणीचीं आहेत. त्यांतील कांही ठळक देवळांची यादी पुढे देतों—

१. पार्श्वनाथ ( जैन ); २. मल्लिकार्जुन ( पहा, शिलालेख, क्र. १ ); ३. गुंडेश्वर ( पहा, शिलालेख, क्र. ३ ); ४. विठ्ठल; ५. वारवेवरील महादेव; ६. तुकाई ( तुळजापूर येथील प्रसिद्ध तुळजाभवानीच्या मंदिराची ही लहान प्रमाणावरील प्रतिकृति असावी ); ७. महादेव ( कुंभारवाड्यांतील ); ८. पद्मावती; ९. अरवाई ( टेकडीवरील ); १०. मारुति; ११. खंडोबा; १२. यमाई ( सावरगाव ते कांटी या रस्त्यावर ).

वरीलपैकी बहुतेक सर्व देवळें यादवकालीन असून त्यांपैकी निदान कांहींतून तरी शिलालेखांचें अस्तित्व एका काळीं असावें असें वाटतें. आज एक मल्लिकार्जुनाच्या देवळांतील शिलालेख ( क्र. १ ) सोडल्यास इतर कोणत्याहि देवळांतून शिलालेख नाहीत. याशिवाय आणखी दोन लेख सावरगावांत मिळाले. ते बहुधा आज नामशेष होऊन गेलेल्या दोन प्राचीन देवळांतील असावे असा तर्क आहे. पैकी महारवाड्यांत सापडलेला शिलालेख ( क्र. २ ) मूळांत दुरगाडी या नांवाने प्रसिद्ध असलेल्या भागांतील असल्याची माहिती गावकऱ्यांनी दिली. दुसरा काळू माळ्याच्या विहिरीवर मिळालेला लेख ( क्र. ३ ) मूळच्या गुंडेश्वराच्या देवळांतील असावा असें त्या लेखांतील तिसरी ओळ सांगते. वरील तीनहि लेखांचे ठसे व त्यांचीं वाचनें पुढे दिलीं आहेत. लेख मिळविण्याचे कामीं सावरगावांतील एक प्राथमिक शिक्षक श्री. भोगले यांची व वाचनाचें कामीं डॉ. मो. गं. दीक्षित आणि श्री. ग. ह. खरे यांची जी मदत झाली त्याबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे.

क्र. १

## कदंब मरड्देव याचा शके १०८६ मधील शिलालेख

उपलब्धि :— प्रस्तुत शिलालेखाचें प्रथम प्रकाशन करण्याचें श्रेय श्री. ग. ह. खरे यांना आहे[१]. लेखाचा ठसा मात्र त्यांनी दिलेला नाही. तसेंच मूळ लेखांतील अखेरची ओळ खराब झालेली असल्याने त्या ओळींतील अक्षरें श्री. खरे यांनी अनुमानाने बसविलीं आहेत. लेख जीर्ण अवस्थेंत असल्याने त्याच्या ७ व्या ओळींतील कांही अक्षरें त्यांना नीट लागलेलीं दिसत नाहीत. इतर ठिकाणींहि श्री. खरे यांच्या वाचनांत एखादुसरी दुरुस्ती सुचविणें शक्य आहे. वरील सर्व कारणांमुळे, एकदा प्रसिद्ध झालेल्या या लेखाचें पुनर्वाचन सोबत जोडलेल्या त्याच्या ठशावरून करणें अगत्याचें वाटतें.

वर्णन :— हा शिलालेख सावरगावांतील मल्लिकार्जुनाचे देवळांत एका दगडी खांबावर खोदलेला आहे. खोदकाम केलेली शिळा चांगली घोटीव आहे. लेखाची लांबी व रुंदी अनुक्रमें १४ व १० इंच असून त्यांत एकूण आठ ओळी खोदलेल्या आहेत. प्रत्येक ओळींत

१ ग. ह. खरे : दक्षिणच्या मध्ययुगीन इति० साधनें, खं. २, पृ. १—३.

साधारणपणें बारा अक्षरें असून खोदकाम वरवर केल्यासारखें वाटतें. पहिल्या दोन ओळींतील अक्षरें आकाराने बरींच मोठीं असून त्या मानाने लेखाच्या शेवटीं शेवटीं अक्षर आकाराने लहान होत गेलें आहे. त्यामुळे लेखाच्या अखेरच्या भागांत उरलेला मजकूर कसातरी कोंबावा लागलेला असून अनवधनाने एकादें अक्षर खोदण्याचें राहून गेल्यासारखें वाटतें. (उदा० फ [ लं ]—ओ. ८).

लिपी : — लेखाची लिपी १०-११ व्या शतकांतील देवनागरी असून सबंध लेखांत पृष्ठमात्रेचा उपयोग कोठेहि केलेला नाही. अक्षरांचें वळण अगदीच सामान्य आहे.

लेखनपद्धति :— या लेखांतील पुढील लेखनविशेष उल्लेखनीय आहेत. (१) तालव्य 'श' ह्या ऐवजी दन्त्य 'स'; उदा० सकु <शकु, ओळ १; सुध <शुद्ध, ओळ २; महामंडलेस्वर <महामंडलेश्वर, ओळ ३; स्वान <श्वान, ओळ ७. ( २ ) अनुनासिकाऐवजी अनुस्वार, उदा० अंबा <अम्बा, ओळ ५; कडंब < कडम्ब, ओळ २. ( ३ ) ऱ्हस्व इ आणि दीर्घ ई यांतील घोटाळा, उदा० भूमी < भूमि, ओळ ८; वीसावा <विसावा, ओळ ५.

भाषा :— प्रस्तुत लेखांतील भाषा संस्कृत व मराठी अशी संमिश्र असून प्राचीन मराठी वळणाचीं पुढील शब्दरूपें पाहण्यासारखीं आहेत ( १ ) सकु, ओ. १, पु. प्र. ए. व. ( २ ) अंबादेवीचेआ, ओ. ५, स्त्री. चान्त षष्ठी. ( ३ ) कीर्तनासि, ओ. ५, नपुं. च. ए. व. ( ४ ) वीसावा, ओ. ५, अंशवाचक संख्याविशेषण. ( ५ ) मला, ओ. ५, पु. प्र. ए. व. ( ६ ) नायके, ओ. ६, पु. तृ. ए. व. ( ७ ) दाम, ओ. ६–७, पु. प्र. अ. व. ( ८ ) गाढवु, ओ. ७, पु. प्र. ए. व. ( ९ ) चांडालु, ओ. ७, पु. प्र. ए. व. ( १० ) फेडी, ओ. ७, फेडणें याचें भविष्ये तृ. पु. ए. व.

काल :— प्रस्तुत लेखांतील कालाचा उल्लेख 'सकु १०८६ तारण संवत्सरे आश्विन सुध १ गुरौ' असा आहे. यासंबंधी श्री. खरे लिहितात, "जंत्रीप्रमाणे गतशक १०८६ ला तारण संवत्सर येतो, पण आश्विन शुद्ध १ ला शनिवार येतो. इंग्रजी तारीख इ. स. ११६४ सप्टेंबर १९ ही येते."

आशयः— या लेखांत कदंबकुलतिलक व महामंडलेश्वर अशा कोणा मरङ्देव राजाचा सेवक भाली याने अंबादेवीच्या देवळास मळयाचा विसावा भाग दान म्हणून लावून दिल्याचा उल्लेख आहे. या शिवाय माधवनायक आणि लाहिपनायक या नांवांच्या दोन गृहस्थांनी या देवळास बहुधा तेलवातीसाठी म्हणून दर महिन्यास दोन दाम याप्रमाणे देणगी दिल्याचाहि निर्देश आहे. लेखाच्या शेवटीं हें दान जो नष्ट करील तो श्वान, गाढव अथवा चांडाल होईल असें म्हटलें आहे. या लेखांतील मरङ्देवाचें नांव गोवें, हानगल व वनवासी यांपैकी एकाहि ठिकाणच्या कदंबांच्या वंशावळींत सापडत नाही असें श्री. खरे म्हणतात. महामंडलेश्वर या पदावरून तो कोणाचा तरी मांडलिक असावा हें स्पष्ट होतें. अंबादेवीच्या देवळास दिलेल्या दानाचा लेख मल्लिकार्जुनाचे देवळांत उपलब्ध व्हावा या गोष्टीचा उलगडा होत नाही.

४

## कदंब मरङ्देव याचा शके १०८६ तील लेख.

### पाठ

(१) सर्कु १०८६ तारण संव
(२) त्सरे आश्विन सुधे १ गुरौ कडंवै
(३) कुलतिलक महामंडलेस्वर मैं
(४) रङ्देव राणक तत्पादपद्मोपजी
(५) वि भाली अंबादेवीचेआ कीर्तनासि वीसौवा गर्ला
(६) माधवनायके लाहिपैनायके मासप्रति दां

---

(१) शकु. या लेखांत आश्विन ( ओ. २ ) हा शब्द खेरीज करून इतरत्र श ऐवजीं स लिहिलेला आहे. (२) शुद्ध. (३) कदंव–ख० (४) मारडदेव–ख० या शब्दाचें वाचन श्री. खरे आता मरङ्देव असें करूं इच्छितात. सोबत जोडलेल्या ठशावरून पाहतां हें वाचन अधिक सयुक्तिक वाटल्याने तें स्वीकारलें आहे. (५) भाली–ख० श्री. खरे यांच्या मतें हें कदंब मारडदेवाच्या कोणा सेवकाचें नांव असावें. परंतु हें वाचन व त्याचा श्री. खरेकृत अर्थ हीं दोन्ही संशयास्पद वाटतात. (६) श्री. खरे हा शब्द देऊळ या अर्थी घेतात तें बरोबर आहे. हा शब्द याच अर्थाने परंतु ' कीर्तने ' अशा स्वरूपांत आंबे जोगाई येथे मला उपलब्ध झालेल्या एका अप्रकाशित शिलालेखांत आला आहे. या शब्दाचे इतर शिलालिखितांतून आलेले उल्लेख श्री. प्रसन्नकुमार आचार्यकृत A Dictionary of Hindu Architecture या ग्रंथांत पहावयास सापडतील. (७) वीसोवे–ख० श्री. खरे यांचा पाठ घेतल्यास या शब्दाचा अर्थ ते म्हणतात त्याप्रमाणे एक तत्कालीन नाणें असा करावा लागतो. हा शब्द याच स्वरूपांत शके ११२८ मधील पाटण शिलालेखांत व ' विंसोवक ' अशा स्वरूपांत संवत् ९६० मधील सियडोणी–लेखांत आढळतो, हें खरें आहे. ( एपि. इंडिका, व्हॉ. १, पृ. १६२—१७९ ). माझ्या मतें या शब्दाचें वाचन ' वीसावा ' असें असून त्याचा अर्थ विसावा भाग असा आहे. महानुभावीय वाङ्मयांत ' विसावा ' या शब्दास एक विशिष्ट अर्थ असून तें कालमापनाचें एक परिमाण धरलें जातें. उदा० स्मरणासंबंधी लिहितांना आचारबंधकार म्हणतात, " तरि मुख्य स्मरणाची संख्या किती असे पा : ना तियेचे वीस विसवा : आन विसवा तो तीन घटिकांचा : तरि वीस त्रिक साठ : एवं विसा विसवांचिया घटका साठ : त्यांचे आठ प्रहर : " ( डॉ. वि. भि. कोलतेकृत महानुभावांचा आचारधर्म, पृ. ३०४ ). म्हणजे विसावा, विसोवा आणि विसवा या तीनहि शब्दांचें मूळ एकच असून ( < सं. विंशोपक ) त्यांचे अर्थ संदर्भानुसार बदलतात. प्रस्तुत ठिकाणीं मळ्याचा विसावा भाग असा अर्थ घ्यावा लागतो. (८) हा शब्द श्री. खरे यांना नीट लागलेला दिसत नाही. प्राचीन मराठी शिलालेखांतून ' ळ ' कार जवळजवळ नाहीच म्हटलें तरी चालेल. (९) लाहिंपनायके–ख० (१०) द्राम–ख०

(७) म २ दत्तं[११] फेडी तो स्वान गोंढवु[१२] चांडालु[१३] य
(८) स्थं[१४] यस्य यदा भूमी तस्य तस्य तदा फ [लं]''[१५]

क्र. २

कृष्णदेव याचा शके १२१५ मधील शिलालेख.

उपलब्धि:—प्रस्तुत शिलालेख सावरगांवाच्या दक्षिणेस, महारवाड्याच्या बाहेरील दगडांच्या एका राशींत मिळाला. अद्यापिहि तो तेथेंच असावा. हा लेख मूळचा 'दुरगाडी' या नांवाने प्रसिद्ध असलेल्या भागांतील असून तेथून तो केव्हातरी महारवाड्यांत आणला गेला अशी माहिती गावकऱ्यांनी दिली. परंतु लेखाचें मूलस्थान अजमावितां येईल असा कोणताहि अंतर्गत पुरावा त्यांत नाही.

वर्णन:—लेख अगदी साध्या शिलेवर खोदलेला असून त्याची लांबी व रुंदी अनुक्रमें १२ व ११ इंच आहे. त्यांतील मजकूर एकूण ६ ओळींचा आहे व प्रत्येक ओळींत सर्वसाधारणपणें १० पासून १२ अक्षरें आहेत. सर्व अक्षरें सारख्या आकाराचीं मात्र नाहीत. पहिल्या दोन किंवा तीन ओळींतील अक्षरें बरींच मोठीं असून पुढील तीन ओळींतील त्या मानानें लहान वाटतात. लेखाच्या शिरोभागीं चंद्रसूर्यांच्या आकृती खोदलेल्या असून अधोभागीं गद्धेगाळीची म्हणजे एका गर्दभाच्छादित स्त्रीची आकृति आहे. गद्धेगाळीचें अश

---

(११) या शब्दावर भाष्य करतांना श्री. खरे म्हणतात, "यापुढे जो या देणग्या फेडणार नाही तो कुत्रा किंवा डुकर वगैरे पशु होईल असें सांगितल्याचें दिसतें. पण फेडी याचा न फेडी हा अर्थ कसा होऊं शकेल? फेडी या ऐवजी 'न फेडी' असे शब्द असते तर फारच बरें झालें असतें." श्री. खरे यांची ही शंका अनाठायीं आहे. कारण मूळ लेखांत 'फेडी तो स्वान' इ० अक्षरें असून फेडणें या क्रियापदाचा अर्थ पाहतां श्री. खरे यांनी कल्पिलेला 'न' अनावश्यक आहे. या ओळीचा अर्थ 'वरील दान जो फेडील म्हणजे नष्ट करील तो श्वान इ० होईल' असा असून मूळांतील न विरहित पाठच बरोबर आहे. फेडणें याचा अर्थ पूर्ण करणें असा केल्यामुळें श्री. खरे यांना वरील दुरुस्तीची जरूर वाटते. वस्तुस्थिति निराळी असून 'फेडणें' हें क्रियापद नष्ट करणें या अर्थी वापरलेलें अन्यत्रहि आढळतें (पहा—आंबेजोगाई येथील शके १०६६ तील उदयादित्याचा शिलालेख, म. सा. पत्रिका, वर्ष २४, अंक ९९ : "जो फेडी लोपी तेआ योगिनींचा वज्र–दंड पडे." दुसरें उदाहरण 'दृष्टान्तपाठां' त आढळतें : "तुतेनि करूनि माती फेडी.").
(१२) गावपशु–ख० (१३) हा शब्द श्री. खरे यांना लागलेला दिसत नाही. कारण त्यांनी प्रस्तुत लेखाचें वाचन केलें तेव्हा त्याचा खालील भाग फारच अस्पष्ट होता. लेख स्वच्छ करून पाहतां 'चांडालु' हीं अक्षरें स्पष्ट दिसतात. (१४) ही शेवटली ओळ अस्पष्ट असल्याने श्री. खरे यांनी तिच्यांतील कांही अक्षरें अनुमानाने बसविलीं आहेत. शेवतच्या ठशांत तीं पुष्कळच स्पष्ट दिसतात. (१५) जागा संपल्याने हें कंसांतील अक्षर खोदण्याचें राहून गेलें आहे.

प्रकारचें रेखाचित्र अनेक शिलालेखांतून आढळतें. उदाहरणार्थ डॉ. सांकळिया व श्री. उपाध्याय यांनी संपादित केलेले ' प्रिन्स ऑफ् वेल्स म्यूझियम् 'मधील शिलाहारांचे शिलालेख' पहावे. द्वितीय अपरादित्याच्या एका लेखांतहि अशाच प्रकारचें रेखाचित्र आलेलें आहे. ' या लेखाचे संपादक डॉ. भगवानलाल इंद्रजी यांनीं म्हटल्याप्रमाणे गद्धेगाळीचें अशा प्रकारचें चित्रण १० व्या शतकानंतर कांही काळ बरेंच रूढ असून महाराष्ट्राबाहेरील शिलालेखांतूनहि तें आढळतें. असो. प्रस्तुत शिलालेखाच्या मजकुरांत कोठे गद्धेगाळ आलेली नसून लेखाच्या शेवटीं चित्र रूपानेच काय ती दिसते. या आकृतीचा कांही भाग मूळ लेखांत घुसल्यामुळे लेखांतील शेवटली ओळ दुभंग झालेली सोबतच्या ठशावरून दिसेल.

लिपीः—लेखाची लिपी ११–१२ व्या शतकांतील देवनागरी असून अक्षरांचें वळण सामान्य आहे.

लेखनपद्धतिः—प्रस्तुत लेखांतील पुढील लेखनविशेष उल्लेखनीय आहेत. १. उष्म-वर्णांचे श ( ' श्री ', ओ. ४ ), ष ( ' कृष्णदेवें ', ओ. ५ ), आणि स ( ' स्री ', ' सके '; ओ. १ ) असे तीनहि प्रकार; २. ऱ्हस्व इ आणि दीर्घ ई यांतील घोटाळा ( ' स्वस्ती ', ओ. १; ' वीजय ', ओ. २ ); ३. संयुक्त व्यंजनाच्या जागीं साधें एकेरी व्यंजन ( ' संवसरे ', ओ. २ ; ' श्रीमप्रौढ– ', ओ. ३;) ४. र पूर्व कठोर व्यंजनाचें द्वित्व ( ' चक्रवर्त्ती ', ओ. ३ ); ५. य या अर्धस्वराची ई या तालव्य स्वरांत परिणति ( ' वीजयादई ', ओ. ४ ); ऋ > इ ही प्रक्रिया ( ' व्रिती ' < सं. वृत्ति, ओ. ५ ).

भाषाः—लेखाची भाषा संस्कृत व मराठी अशी संमिश्र आहे. जुन्या मराठी वळणाची पुढील रूपें महत्वाचीं आहेतः—कृष्णदेवें–पु. तृ. ए. व. ( ओ. ५ ); व्रिती–स्त्री. प्र. ए. व. ( ओ. ५ ); संपादुनी–भूत ऊन कृदन्त ( ओ. ५ ); मला–पु. प्र. ए. व. ( ओ. ६ ); देवा–पु. च. ए. व. ( ओ. ६ ); गोविला–भूत कृन्दताचे पु. तृ. पु. ए. ब. ( ओ. ६ ).

काळः—लेखांतील कालोल्लेख ' सके १२१५ वीजय संवसरे ' असा आहे. ज्ञानेश्वरी शके १२१२ मध्ये लिहिली गेली. त्यानंतर तीन वर्षांनी खोदलेल्या प्रस्तुत शिलालेखांत ज्ञानेश्वरीच्या अंतीं येणारा रामदेवराव यादवाचा उल्लेख यावा हें बरोबरच आहे. कालविषयक इतर तपशील लेखांत दिलेला नाही.

आशयः—प्रस्तुत शिलालेखांत कोणा श्रीपति कृष्णदेवाने कोण्या एका देवासाठी वृत्ति संपादन करून एक मळा गोविल्याचा म्हणजे लावून दिल्याचा उल्लेख आहे. दान ज्या देवासाठी केलें त्याचें नांव अखेरच्या ओळींत आलेलें असून ही ओळ गद्धेगाळीच्या आकृतीने दुभंग होऊन गेल्याने ' देवा ' या शब्दामागील कांही अक्षरांना आपण मुकलों आहों. साहजिकच देवस्थान कोणतें तें कळण्यास कांही मार्ग नाही. परंतु सावरगांवचे महार सांगतात त्याप्रमाणे हा लेख मूळचा दुरगाडी नांवाच्या भागांतील असल्यास त्या भागात एक महादेवाचें देऊळ असल्याने वरील उल्लेख महादेवाचा असणें संभवतें. परंतु हा केवळ तर्क आहे. दान देणारा श्रीपति कृष्णदेव हा लेखांतील उल्लेखावरून पाहतां रामदेवराव यादवाचा मांडलिक अगर त्याच्या हाताखालील एक अधिकारी दिसतो. हा श्रीपति कृष्णदेव आणि यापुढील क्र. ३ या लेखांतील ' स्रीपती '--ओ. ६ या व्यक्ती एकच असतील तर कांही गोष्टींचा उलगडा होणें शक्य आहे. असो. खुद्द रामदेवराव यादवाचा उल्लेख ' श्रीम ( त् ) प्रौढप्रतापचक्रवर्त्ती श्रीरामचंद्रदेव ' याप्रमाणे आलेला असून या काळांतील इतर शिलालेखांतून येणाऱ्या उल्लेखांशीं तो साधारणपणें जुळता आहे.

## कृष्णदेव याचा शके १२१५ तील लेख

### पाठ

(१) स्वस्ती[1] स्री[2] सके[3]
(२) १२१५ वीजयें[4] संवसरें[5] अद्ये
(३) ह श्रीमप्रौढप्रतापचर्क्रवर्त्ती[6]
(४) श्री रामचंद्रदेव वीजयोंदई[7] श्रीप (ति[8] ?)
(५) कृष्णदेवें त्रिती[9] संपादुनी ........
(६) मला १ ............[10] देवा[11] गोविलों[12]

---

( १ ) स्वरित. ( २ ) श्री. ( ३ ) शके. ( ४ ) विजय. ( ५ ) संवत्सरे असें पाहिजे. ( ६ ) श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ती असें पाहिजे. ( ७ ) विजयोदयि असें पाहिजे. ( ८ ) 'ति' हें अक्षर फुटून गेलें आहे. यापुढील क्र. ३ या शिलालेखांत ज्या 'स्रीपती' चा उल्लेख येतो तोच हा असावा. पंढरपूर येथील सुप्रसिद्ध चौऱ्यांयशीच्या शिलालेखांत 'श्रीपति दंणायक' म्हणजे दंडनायक या व्यक्तीचा उल्लेख तीनचारदा आला आहे. श्रीपति कृष्णदेव हाच तो दंडनायक श्रीपति असणें शक्य आहे. ( ९ )< सं. वृत्ति. ( १० ) या अक्षरांवर गद्धेगाळीची आकृति आल्याने तीं नाहींशीं झालीं आहेत. त्यांत बहुधा ज्या देवास दान केलें त्याचें नांव असावें असें यापुढील 'देवा' या शब्दावरून वाटतें. ( ११ ) देव या पु० नामाचें च. ए. व. ( १२ ) गोवणें = लावून किंवा गुंतवून देणें; to attach.

क्र. ३

## गुंडेश्वराचे देवालयांतील शिलालेख

उपलब्धि:— प्रस्तुत शिलालेख सावरगावापासून सुमारें अर्धा मैल दूर असलेल्या एका शेतांतील विहिरीच्या काठावर पडलेला आढळला. ही विहीर काळू माळ्याची विहीर या नांवाने ओळखली जाते, व तिच्या काठावर प्राचीन खोदकामाचे कांही अवशेष भग्नावस्थेंत पडून आहेत. त्यांत शिलालेख असा हा एकच मिळाला. लेखांतील उल्लेखावरून पाहतां तो मूळचा गुंडेश्वराच्या देवळांतील असावा हें स्पष्ट होतें. सावरगावांतील या देवळाचा उल्लेख प्रास्ताविक भागांत आलेलाच आहे. हा शिलालेख गुंडेश्वराच्या देवळांतून काळू माळ्याच्या विहिरीवर केव्हां व कसा गेला तें कळूं शकलें नाहीं.

वर्णन:— लेख एका साध्या शिलेवर खोदलेला असून त्याच्या वरच्या बाजूची दोही अंगें थोडथोडीं फुटून गेल्याने पहिल्या दोन ओळींतील कांही महत्वाच्या मजकुरास आपण मुकलों आहों. तसेंच पांचवी, सहावी, व नववी या तीन ओळींतील कांही अक्षरें फुटून गेलीं आहेत. एकंदर लेख सुस्थितींत नाही. आज अनेक वर्षें तो शेतांत पडून असल्याने त्यावरील मजकूर अतिशय अस्पष्ट झालेला आहे. लेखाची लांबी व रुंदी जवळजवळ

सारखी म्हणजे प्रत्येकीं चौदा इंच असून लेख खालच्या बाजूस उजवीकडे कललेला दिसतो लेखाच्या एकूण ओळी अकरा असून प्रत्येकींत सुमारें बारा अक्षरें आहेत.

लिपीः—लेखाची लिपी १०–११ व्या शतकांतील देवनागरी असून पृष्ठमात्रा कोठेहि नाही. अक्षरांचें वळण मागील लेखापेक्षा थोडें बरें आहे.

लेखनपद्धतिः— या लेखांतील पुढील लेखनविशेष महत्वाचे आहेत. ( १ ) तालव्य ' श ' च्या जागीं दन्त्य ' स ' उदा० भुवनासय <भुवनाश्रय, ओ. १; परमेस्वर<परमेश्वर, ओ. २; गुंडेस्वर<गुंडेश्वर, ओ. ३; तीसुधाधिका<त्रिशुद्धाधिका, ओ. ४; स्रीपतिए<-श्रीपतिए, ओ. ६.(२)=ह्रस्व इ आणि ई यांतील घोटाळाः उदा० तीसुधाधिका<त्रिशुद्धाधिका, ओ. ४; दाईआ≤दाइआ, ओ. ७. ( ३ ) संयुक्त व्यंजनाच्या जागीं साधें व्यंजन : उदा० तीसुधाधिका<त्रिशुद्धाधिका, ओ. ४; दता<दत्ता, ओ. ६; जीर्णोधारु<जीर्णोद्धारु, ओ. ७.

भाषाः— लेखांतील प्राचीन मराठी वळणाची पुढील रूपें विशेष उल्लेखनीय आहेत. ( १ ) तेयाचेया, ओ. ५, ' त ' या दर्शक सर्वनामाची चान्त षष्ठी. ( २ ) कुलालागिएं ओ. ६, ' कुळ ' या नपुं. नामाची शब्दयोगीसाधित चतुर्थी. ( ३ ) स्रीपतिए, ओ. ६, पु. तृ. ए. व. ( ४ ) जीर्णोधारु, ओ. ७, पु. प्र. ए. व. ( ५ ) दाईआ, ओ ७, पु. च. ए. व. ( ६ ) तेहाचा, ओ. ८, ' त ' या दर्शक सर्वनामाची चान्त षष्ठी. ( ७ ) धर्मु, ओ. ८, पु. प्र. ए. व. ( ८ ) हे, ओ. ८, ' ह ' या सर्वनामाचें स्त्री. द्वि. ए. व. ( ९ ) भाष, ओ. ८, स्त्री. द्वि. ए. व. ( १० ) माय, ओ. ९, स्त्री. द्वि. ए. व. ( ११ ) गाढौ, ओ. ९, पुं. प्र. ए. व. ( १२ ) प्रतिपालिजे, ओ. १०, विध्यर्थी तृ. पु. ए. व.

कालः— लेखांत कालाल्लेख नाही. भाषेवरून व अक्षरवटिकेवरून पाहतां तो १२-१३ व्या शतकांतील दिसतो, त्यांतील मराठी शब्दांचीं प्राचीन रूपें स्पष्ट आहेत. तसेंच लेखांतील ' स्रीपति ' चा उल्लेख सूचक आहे. कारण मागील लेखांत क्र. २—श्रीपति कृष्णदेवाचा उल्लेख असून तोच हा असेल तर या लेखाचा काल शके १२१५ च्या आसपास यावा. पंढरपूर येथील चौऱ्यांयशीच्या लेखांत ( शके ११९२ ते ९९ ) तीनचार ठिकाणीं उल्लेखिलेला श्रीपति दंडनायक हाच असण्याची शक्यता आहे.

विषयः— लेखाचा वरचा भाग फुटून गेल्याने त्यांतील विषयाचा स्पष्ट उलगडा होणें कठिण झालें आहे. परंतु असें दिसतें, की सावरगावांतील गुंडेश्वराच्या देवस्थानास धूप-दीपासाठी कायम स्वरूपाची मासिक देणगी मूळची होतीच. ही देणगी ज्याने प्रथम दिली त्या राजाचा अस्पष्ट असा उल्लेख पहिल्या दोन ओळींत येतो. मात्र त्याचें नांव कळत नाही. पुढे या राजाचा प्रपौत्र कोणी श्रीपति ( कृष्णदेव ? ) याने देवळाचा किंवा आपल्या पणजाने देवळास केलेल्या दानाचा जीर्णोद्धार केला असा निर्देश पांचव्या ओळीपासून पुढील तीन ओळींत येतो. त्यानंतर या देणगीचें जो प्रतिपालन करील तो धर्मनिष्ठ होय असें म्हणून जो कोणी ही ' भाष ' म्हणजे हें वचन मानणार नाही किंवा मोडेल त्याची ' माय गाढौ घेइ ' म्हणजे त्याच्या आईस गाढव लागेल असा शाप दिला आहे. या शापानंतर लेखाचे शेवटीं पुनः एक दाम दिल्याचा उल्लेख करून लेख संपविला आहे. हा शेवटचा उल्लेख कोणास अनुलक्षून आहे तें कळत नाही. ९ व्या ओळींतील ' कानेया ' या शब्दावरून कान्हा या नांवाच्या पुजाऱ्यास एक दाम दिल्याचा हा निर्देश असावा असा तर्क करतां येतो. परंतु तो केवळ तर्क आहे.

## गुंडेश्वराचे देवालयांतील लेख.

### पाठ

(१) …[1]… मति भुवनाश्रय[2] …[3]…
(२) …[4]… राजाधिराज परमेस्वरे[5] …[6]…
(३) गुंडेस्वर[7] देवस्थाने द (दा) न धूपदीप
(४) त्रीसुर्धाधिका[8] ग्राम [ मे[9] ] ध्यें मासंप्रति
(५) प्रपौत्र तेयाचेया कुला पाल्य बै …[10]…
(६) [11]… कुलालोगिएं[12] स्त्रीपतिएं[13] दत्तों[14]:
(७) जीर्णोधोरु[15] केला जो दाईआं[16] प्रति [ पं[17] ]
(८) ली तेहे[18]चा धर्मु हे भाषे[19] प्रतिपाली ना ते [20]…
(९) माये[21] गाढौ घेइ कानेया [22]… दीन…[23]
(१०) दामु एकु प्रतिपालिजे मंगल
(११) [ मह ] श्रीः

---

(१) शिळा फुटून गेली आहे. (२) भुवनाश्रय (३) शिळा फुटली आहे. (४) शिळा फुटली आहे. (५) परमेश्वर. (६) शिळा फुटली आहे (७) गुंडेश्वर. सावरगावांतील गुंडेश्वराचें म्हणजे महादेवाचें देऊळ. (८) त्रिशुद्धाधिका. (९) 'ग्राममध्यें' असें पाहिजे. दोन 'म' कार निकट आल्याने त्यांतील एक गळून गेला आहे. (१०) शिळा फुटून गेल्याने येथील अक्षरें नष्ट झालीं आहेत: (११) येथील अक्षरांनाहि आपण मुकलों आहों. (१२) हें रूप चिंत्य आहे. लागि हें चतुर्थीचें शब्दयोगी अव्यय मानल्यास त्यापुढील एं हा (तृतीयेचा ?) प्रत्यय अनावश्यक ठरतो. अशा प्रकारचें एक रूप ज्ञानेश्वरींत आढळतें. पहा "याकारणें मियां । गीतार्थु मऱ्हाटिया । केला लोकालागिया । दिठीचा विखो ।।" – राजवाडे प्रत, शा० १८ - १७१४. (१३) श्रीपति या पु० नामाचें तृ. ए. व. (१४) दत्ता. (१५) जीर्णोद्धार. (१६) सं. देय < म. दाय, या पु० नामाचें च. ए. व. दाया < दाइया (= देणगीस, दानास). दाय हा शब्द दाये किंवा दावो अशा रूपांत 'दृष्टांतपाठां' त आढळतो (दृ. ४०, ९२). (१७) हें अक्षर फुटून गेलें आहे. (१८) त या दर्शक सर्वनामाचें हें ह–युक्त रूप उल्लेखनीय आहे. (१९) सं. भाषा > म. भाष, स्त्री. द्वि. ए. व. (२०) येथील अक्षरें फुटून गेलेलीं असून हा शब्द बहुधा 'तेहाची' असा असावा. पुढील माय या स्त्रीलिंगी नामाचें तें विशेषण असणार. (२१) माय (स्त्री० द्वि. ए. व.), गाढौ (पु० प्र. ए. व.), व घेइ (स्वार्थे भविष्य तृ पु. ए. व.) याप्रमाणें या रूपांचें निर्वचन आहे. 'गाढव माय घेईल' हा एक तत्कालीन वाक्प्रचार असून त्याचा अर्थ गद्धेगाळीप्रमाणेच आहे. परळ येथील शिलालेखांत ही शिवी याहून अधिक स्पष्टपणें आली आहे (२२) व (२३) या ठिकाणचीं अक्षरें फुटून गेल्याने त्यांचें वाचन करणें व अर्थ लावणें अशक्य झालें आहे. पुढील ओळींत पुनः एकदा एक दाम दिल्याचा उल्लेख असल्याने 'कानेया' हा शब्द व्यक्तिवाचक असणें संभवनीय वाटतें. तसें असल्यास सं. कृष्ण > म. कान्हा > काना या पु० नामाची ही चतुर्थी असावी.

# परीक्षणें

चंद्रलेखाः— [ कवि- गिरीश. प्रकाशक-शं. के. कानेटकर. 'कांचन,' विश्रामबाग, सांगली. मूल्य सव्वातीन रुपये. पृष्ठे १०४ ]

रविकिरण मंडळाचे सदस्य सुप्रसिद्ध कवि गिरीश यांच्या स्फुट कवितांचा हा चवथा संग्रह आहे. यांत गिरीशांनी गेल्या दशकांतील आपल्या लहानमोठ्या कवितांचें संकलन केलें आहे. संकलनाचें ' चंद्रलेखा ' हें नांव साभिप्राय आहे. तपोमग्न भगवान् गिरीशाच्या मौलीवर ज्याप्रमाणे चंद्रलेखा आपल्या शीतल कांतीने झळाळत असते, त्याप्रमाणे कवि गिरीशांची ही ' चंद्रलेखा ' आपल्या शांतिस्निग्ध किरणांनी झगमगत आहे.

गिरीशांच्या या कवितासंग्रहांत गेल्या दश वर्षांत समाजजीवनांत उलथापालथ घडवून आणणाऱ्या ज्या ज्या घडामोडी झाल्या, त्या त्या सर्वांचें उठावदार प्रतिबिंब वठलें असून धीरगंभीर पडसाद उमटले आहेत. दुसरें जागतिक महायुद्ध, तज्जन्य महागाई, टंचाई, रोगराई व उपासमार, जपान-ब्रह्मदेशांपर्यंत पसरलेल्या त्याच्या ज्वाला, नेताजी सुभाष व कॅप्टन लक्ष्मी यांच्या आझाद सेनेचा पराक्रम, बेचाळिसच्या चळवळीचे बळी, पुढाऱ्यांचा कारागृहवास, त्यांची मुक्तता, पंजाब व बंगालचें विभाजन, स्वातंत्र्यप्राप्ति ह्या सर्वांनी पाहिलेल्या इतिहासांतील घटनांचा चालताबोलता चित्रपट या कवितासंग्रहाच्या उज्ज्वल रजतपटावर गिरीशांनी छायांकित केला आहे. आणि त्यांचें छायाचित्रण घेत असतांनाच त्यांनी भारताच्या भावी भाग्याचें सुरेख स्वप्न पुढील शब्दांत साकार केलें आहे:—

येई येई भारद्वाजा ! पंख हालवी सोनेरी
निवेदाया नवें वृत्त येई येई माझ्या दारीं
शेतांशेतांतून काय नवीं पिकें तरारलीं ?
तरुणांच्या अंतरीं कीं नवीं तेजें भरारलीं ?
विमानांच्या घोंघावांत मिळे पाईकांस ताल ?
अनिर्वेद सुखासाठी होई नौकांची की चाल ?
बंधुभाव, बंधुभाव कणोकणीं पसरला ?
पंथ, पक्ष, मतभेद वाऱ्यामधे वा विरला ?
स्वातंत्र्याच्या वैभवाने संपन्नता शिगे आली ?
दिसलीं की भारतांत स्वप्नें अशीं खरीं झालीं ?

गिरीशांचे या पूर्वीचे काव्य-संग्रह चाळून पाहिले, तर त्यांत या प्रकारचे सूर क्वचितच आढळतील. त्या पूर्वीचा काळ हा या दहा वर्षांच्या काळाच्या मानाने शांततेचा व सुरक्षिततेचा होता. तेव्हा त्यांत कलेच्या विविध अंगांवरील कवितांना बहर यावा हें स्वाभाविकच होतें. रविकिरण मंडळाचा उदय ज्या काळीं झाला तो काळच मुळीं 'स्वान्तःसुखाय' प्रवृत्तीचा असल्यामुळे साहजिकच त्या काळीं जी कविता जन्माला आली ती कलात्मक

आविष्काराच्या दृष्टीने परिपूर्णतेच्या पायरीला पोचली आहे. पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याहि वाङ्मयाकडे दृष्टिक्षेप केला, तर त्याच्या इतिहासांत एक काळ असा आलेला दृष्टीस पडतो. हेंच सत्य लक्षांत घेऊन डॉ. जान्सन्ने बहुधा पुढील मत व्यक्त केलें असावें:— Whatever be the reason it is commonly observed that the early writers are in possession of nature, and their followers of art; that the first excel in strength and invention, and the latter in elegance and refinement. तेव्हा रविकिरण मंडळ कलाकवितेच्या काळास कारण झालें म्हणूनच केवळ त्याच्यावर गहजब करण्याचें कारण नाही. गेल्या दशकांत रविकिरण मंडळाची कविता म्हणजे सर्वसामान्य भावनांची सामान्य कविता आहे, ती दुसरें तिसरें कांही नसून पालुपद, अंतरा व विस्तार यांच्या चौकटींत बसवलेली ठोकळेबाज कविता आहे, ती ऱ्हास काळांतील कविता आहे, तिच्यांत आत्मनिष्ठेचा अभाव आहे, अशा तऱ्हेचे अनेक आरोप तिच्यावर करण्यांत आले आहेत. गोविंदाग्रजांच्या मृत्यूनंतर त्यांच्या कवितेवर जसा चोहोकडून हल्ला करण्यांत आला, तसाच हल्ला माधव ज्यूलियन यांच्या निधनोत्तर रविकिरण मंडळावर करण्यांत येत आहे. या आक्षेपकांचा एक विशिष्ट गट आहे. आणि तो स्वतःच्या प्रतिष्ठेसाठी या पूर्वगामी मंडळाची अकारण कुचेष्टा करीत आहे. परंतु रविकिरण मंडळांतील 'यशोगिरीं'नी मराठी कवितेला कलाकुशल करतांना आपल्या रक्ताचें पाणी केलें आहे हें सत्य इतिहासाला डावलतां येणें शक्य नाही. त्याविरुद्ध करण्यांत येत असलेली अकृतज्ञ कुई वाऱ्यावर विरून जाईल; परंतु त्याची भरीव कामगिरी अभ्यासकाच्या स्मरणांत कायमची राहील.

गिरीशांच्या प्रस्तुत कवितासंग्रहांतहि त्यांच्या पूर्वीच्या कवितासंग्रहांतून कानीं पडत असलेले कांही जुने सूर आळवलेले आहेत. भडकमकर, खांडेकर, करमरकर, पटवर्धन आदि आपल्या स्वकीयांसंबंधींची आत्मीयता; अरु, मिणी, अशोक, चंद्रलेखा आदि बालगोपालांविषयींची वत्सलता; शेतकरी, कामकरी आदि श्रमजीवि बांधवांबाबतची सहानुभूति आणि पतितांबद्दलची उदारवृत्ति या सर्वांचा उद्रेक निरनिराळ्या कवितांतून झाला आहे. पण यांत गिरीश ठराविकांपलिकडे गेलेले नाहीत. बालगोपालांचें आजाआजी कौतुक करतात तें सर्वांच्या परिचयाचें आहे. पण बालगोपालांना आजाआजींबद्दल काय वाटतें तें सांगण्यांत 'काव्य' आहे. विधवा, परित्यक्ता, रखेली—हे अभागिनींचे नमुने आता जुनेपुराणे झाले. विवाहविच्छेदातुर युवती, कुमारी माता, वयातीत कुमारी, बहकलेली तरुणी—हे अभागिनींचे नमुने अलिकडले आहेत. आणि त्यांच्या भावनांना आता तोंड फोडलें पाहिजे. थोड्या नव्या दिशेने आता वाटचाल केली पाहिजे.

नव्या दिशेने पाऊल टाकतांना गिरीशांनी 'देऊळ बांधणारास' व 'नांगरयोगी' हीं दोन कन्नड भाषांतरें उपस्थित केलीं आहेत. तीं वेगळीं व आगळीं म्हणून अभिनंदनीय आहेत. मराठीच्या काव्यगंगेस यमुना, ब्रह्मपुत्रा, गोमती, गंडकी आदि येऊन मिळाल्याशिवाय तिची भव्यता खुलणार नाही. आपला महाराष्ट्र भारताच्या मध्यभागीं आहे. धारवाड-बेळगावकडून त्याचा कानडीशीं, चांदा-बल्लारशहाकडून तेलगूशीं, बिलासपूर-संभलपूरकडून उडिया व बंगालीशीं, जबलपूर-छिंदवाड्याकडून हिंदीशीं आणि जळगांव-अंमळनेरकडून गुजराथीशीं संबंध येतो. या साऱ्या भाषाभगिनींच्या सहकाराने कवींनी महाराष्ट्रशारदेचें वैभव वृद्धिंगत करण्यांत कोणत्याहि तऱ्हेचा कमीपणा नाही. राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या आजच्या युगांत एकजुटीचा एक मार्ग म्हणून तो अतिशय आवश्यक आहे.

गिरीशांच्या या कवितासंग्रहाकडे पाहिलें म्हणजे घासतां घासतां झिजलेल्या चंदनाच्या खोडाची आठवण येते; त्याची मूलभूत शक्ति कायम आहे, त्याचा सुवास कमी झालेला नाहीं. परंतु त्याच्या मर्यादा अधिकाधिक आकुंचित होत आहेत. फुलझाडाला व फळझाडाला आरंभीं आरंभीं कांहीं वर्षें बेसुमार भर येतो आणि पुढे पुढे तो कमी होत जातो हा निसर्गाचा अनुभव कुणास नाहीं? त्याबद्दल त्या झाडांना बोल लावणें केव्हांहि अनुदारपणाचें व कृतघ्नपणाचें ठरेल.

— भ. श्री. पंडित

स्नेहाचे झरे ( पत्रसंग्रह )

ले. आचार्य दादा धर्माधिकारी ( सं. श्रीपाद जोशी ),
प्र. पां. रा. ढमढेरे. ३२२।३ सदाशिव, पुणें २, किंमत २ रु.

'स्नेहाचे झरे' हा आचार्य दादा धर्माधिकारी यांच्या पत्रांचा श्रीपाद जोशी यांनी संपादित केलेला संग्रह. आचार्यांनी आपल्या स्वायत्त अपत्यांना, आप्तांना, सोबत्यांना व स्नेही-जनांना जीं पत्रें लिहिलीं त्यांतील कांहीं पत्रें संपादकांनी या संग्रहांत संगृहीत केलीं आहेत.

एका दृष्टीने जर पाहिलें तर 'पत्र' हें 'लघुनिबंधा'चें धाकटें भावंड. लघुनिबंधामध्ये ज्याप्रमाणे अनौपचारिकता, जिव्हाळा, व खेळकरपणा असतो त्याप्रमाणे तो पत्रांतहि स्वाभाविकपणेच आढळतो. आणि त्याबरोबरच पत्रलेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचें दर्शन लघुनिबंधापेक्षाहि पत्रांतून अधिक घडतें. जिव्हाळ्याच्या व्यक्तीला लिहिलेल्या पत्रांत लेखक आपलें अंतरंग निःसंकोचपणें व्यक्त करीत असल्याने लेखकाची खरी ओळख आपणाला लघुनिबंधापेक्षाहि त्याने लिहिलेल्या खाजगी व जिव्हाळ्याच्या पत्रद्वारेंच अधिक पटते. रोजनिशी व पत्रें यांचें या दृष्टीने अधिक जवळचें नातें आहे.

आचार्य धर्माधिकारी यांचीं हीं विविध विषयावर आपल्या जिव्हाळ्यांतील व्यक्तींना लिहिलेलीं पत्रें वाचत असतांना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू आपणांला त्यांत प्रगट झालेले दिसतात. त्यांचा प्रेमळ स्वभाव, निकटवर्ती जनाबद्दल त्यांना वाटणारी कळकळ, जीवनाकडे पहाण्याचा त्यांचा समंजस व आशावादी दृष्टिकोन, वैयक्तिक गुणदोषांची जाणीव असे एक ना दोन! त्यांचें विविधरंगी व्यक्तिमत्त्व या पत्रांतून पूर्णपणें प्रतिबिंबित झालेलें आपणाला आढळेल.

या पत्रांतून त्यांनी विविध विषयांवर आपल्या जिव्हाळ्याच्या व्यक्तींबरोबर चर्चा केली असली तरी त्यांमधून सतत वाहणारा जो स्नेहाचा व भावनेचा झरा आहे त्यामुळे या पत्रांना मोठें मोहक स्वरूप प्राप्त झालें आहे. विशेषतः हीं सर्व पत्रें सत्यसृष्टींतील व्यक्तींनाच लिहिलीं असल्याने त्यांतील भावनेचा उमाळा व प्रेमाचा आविष्कार आपणांला विशेष जाणवतो. 'समर्पणाचें विज्ञान' 'शरीरोत्सर्ग व आत्महत्या' अशासारखीं कांहीं पत्रें भावनांनी ओथंबलेलीं आहेत. त्यामुळे हीं पत्रें वाचतांना आचार्यांच्या हृदयांतील भावोत्कटतेचें दर्शन आपणांला होते व त्या त्या व्यक्तींबद्दल कुतूहलपूर्वक जिव्हाळाहि निर्माण होतो.

पण या पत्रांतून जें मौलिक विचारांचें दर्शन आपणांला घडतें त्यामुळे या पत्रांना निराळेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. आचार्य धर्माधिकारी यांच्या व्यक्तिमत्त्वाची ही दुसरी बाजू अधिक महत्त्वाची व रोचक वाटते. या निरनिराळ्या पत्रांतून त्यांनी कुटुंबविषयक,

जीवनविषयक, समाजविषयक व राजकारणविषयक जे निरनिराळे विचार मांडले आहेत, ते फार महत्त्वाचे आहेत. ' कौटुंबिक भावनेचा विस्तार, ' ' तूं बंड करणार आहेस ना ? '; ' फक्त हेतु शुद्ध व उदात्त असणें पुरेसें नाही,' ' राजकारण हें असें आहे ', ' राजकारणांत स्त्रीचें स्थान ' इत्यादि अनेक विषयांवर त्या त्या व्यक्तींशीं त्यांनी केलेली चर्चा मूलगामी आहे. त्यांत आग्रह नाही—हटवादीपणा नाही किंवा कोणत्याहि पक्षाचा आभिनिवेश नाही. अतिशय वरच्या पातळीवरून व्यक्तिजीवनापासून तों राजकारणापर्यंत निरनिराळ्या विषयांवर त्यांनी केलेली चर्चा कुणाहि सामान्य व्यक्तीला मार्गदर्शक होईल अशीच आहे. आणि ही सर्व चर्चा ज्या जिव्हाळ्याने व आत्मीयतेने केली आहे तो जिव्हाळा व ती आत्मीयता तर विशेष हृद्य आहे. त्यामुळे हीं सर्व पत्रें म्हणजे छोटे छोटे लघुनिबंधच वाटतात. किंबहुना, त्यांतील जिव्हाळा जिवंत असल्यामुळे तीं पत्रें लघुनिबंधापेक्षाहि अधिक आकर्षक वाटतात. त्यांत पुन्हा ' काळ हें जसें जीवनाचें अपहरण करणारें तत्त्व आहे त्याप्रमाणे तें जीवनपोषकहि तत्त्व आहे', 'वस्तु हरवली म्हणजे तिचें महत्त्व जाणवायला लागतें.'; ' लग्न म्हणजे कौटुंबिक जीवनाचा उपक्रम.'; ' माणसाला एकट्याने जगण्यांत समाधान न वाटणें हें त्याच्या माणुसकीचें पहिलें लक्षण आहे.'; ' एकाद्याचें जीवन योगमय असतें, एकाद्याचें जीवन प्रयोगमय असतें. ' अशासारखीं सुभाषितवजा वाक्यें तर पानापानावर विखुरलेलीं आढळतात. त्यामुळे त्यांच्या शैलीला मोहकतेची झालर लागल्यासारखी वाटते. कांहीं कांहीं पत्रांतून काव्यात्म वर्णनें आहेत; त्यांचाहि मुद्दाम उल्लेख केला पाहिजे. ' रात्रीचा विमान-प्रवास ' यांतील रात्रीच्या वेळीं विमानांतून दिसणाऱ्या दिल्ली शहरांतील दिव्यांचें वर्णन, ' प्रेमाबाईच्या आश्रमांत ' यांतील प्रेमाबाईच्या आश्रमाचें वर्णन हीं वर्णनें त्या दृष्टीने वाचण्यासारखीं आहेत.

एकंदरींत हीं पत्रें वाचतांना भावना, कल्पना व तत्त्वज्ञान यांचा मोहक संगम झाल्याची प्रचीति तर आपणांला येतेच पण आचार्य धर्माधिकारी यांच्या व्यक्तित्वाच्या सर्व पैलूंचें दर्शनहि आपणांला घडतें. त्यामुळेच हे ' स्नेहाचे झरे ' मोठे प्रसन्न वाटतात. त्यांतील मधुर जलाचें कितीहि प्राशन केलें तरी तें कमीच वाटतें. असे निर्मळ व मधुर स्नेहाचे झरे दादा धर्माधिकाऱ्यांच्या लेखणींतून नेहमी स्रवावेत अशी इच्छा हें पुस्तक वाचणारा कुणीहि करील, यांत शंका नाही.

— म. ना. अदवंत.

**वाङ्मयीन मूल्यें आणि जीवन मूल्यें—व इतर लेख.**

ले. डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये. प्रकाशकः— व्हीनस् बुकस्टॉल, पुणें. किंमत २ रु.

डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये यांनी वेळोवेळीं प्रसिद्ध केलेल्या अकरा निवडक टीकालेखांचा हा संग्रह आहे. या टीकालेखांतून त्यांनी नवें जुनें काव्य, नाटक, कादंबरी, विनोद, बखरी इत्यादि ललितवाङ्मयाच्या मुख्य प्रकारांसंबंधीं आपले तात्त्विक विचार प्रगट केले आहेत. टीकाकारास अवश्य असणारी मर्मग्राही बुद्धि आणि व्यासंग हे दोन गुण सदर लेखांतून पानोंपानीं व्यक्त झाल्याने ते उद्बोधक झाले आहेत. कला व जीवन यांचा अन्योन्यसंबंध हा वाङ्मयटीकेंतील एक नेहमीचा वादग्रस्त विषय आहे. त्याचा उपन्यास करून डॉ. ग्रामोपाध्ये यांनी समतोलपणाने दिलेला पुढील निर्णय सर्वमान्य होणारा आहे: ' वाङ्मयीन मूल्यें स्वतंत्र

असली तरी तीं जीवनाच्या शाश्वत व अंतिम मूल्यांशीं एकरूप झालीं पाहिजेत.' 'महाकाव्याची अनिर्मिति कां?' या लेखांत 'व्यापक वस्तुनिष्ठ दृष्टीचा अभाव' हेंच मराठींत महाकाव्यें न होण्याचें मुख्य कारण आहे' असें डॉ. ग्रामोपाध्ये म्हणतात. पण वर्तमानकाल व लेखकांच्या 'व्यापक वस्तुनिष्ठ दृष्टीचा अभाव' यांतील कार्यकारणभाव त्यांनी समाधानकारकपणें सिद्ध केलेला नाही. 'विनोद आणि काव्य' यावर प्रगट केलेल्या विचारांत 'शुद्ध काव्य आणि विनोद' यांचे प्रकृतिधर्म परस्परांपासून भिन्न असल्याने विनोदी लिखाण (मग तें गद्य असो की पद्य असो) हें काव्य नव्हे आणि त्यामुळे हास्यरस हाहि खऱ्या अर्थाने 'रस' पदवीस योग्य नाही' अशा अर्थाचें प्रमेय त्यांनी मांडलेलें आहे, तें चिंत्य आहे. विनोदाचा हेतु उथळ व बेजबाबदार हास्य निर्माण करणें येवढाच नसतो, विनोदी वृत्ति ही एक जीवनाकडे जबाबदारीने पाहण्याची स्वतंत्र दृष्टि आहे तिच्यामध्ये औचित्यविवेक आहे व तिची प्रेरणा व परिणाम हाहि भावनात्मकच असतो. त्यामुळें विनोदाचें काव्याशीं साहचर्य असण्यास प्रत्यवाय नाही. याप्रमाणे इतरहि टीकालेखांतील विचारसरणीशीं वाचकाचें कधी सहमत तर कधी विमत होईल (कारण वाङ्मयविषयक मतांमध्ये बऱ्याच प्रसंगीं व्यक्तिनिष्ठेचा भाग असूं शकतो.) तथापि डॉ. ग्रामोपाध्ये यांनी मांडलेले विचार अनुकूल-प्रतिकूल पक्षांचा अगदी वा. म. जोश्यांच्या सत्यनिष्ठ काटेतोलपणाने विचार करून मांडलेले असतात. त्यामुळे ते विचाराला चालना देणारे आहेत याबद्दल दुमत नाही. मराठींतील कांही टीकाकारांच्या लेखनांत आढळणारा एक विशेष (मग त्याला कोणी दोष किंवा गुण म्हणोत) ग्रामोपाध्यांच्या टीका-लेखांत दिसतो. विषयाची निर्भेळ तात्त्विक चर्चाच करणें, प्रमेयामागे कोरडीं प्रमेयें सांगत राहणें, जीवन-निष्ठा, कला-मूल्यें, सत्याचा साक्षात्कार, सौंदर्यात्मक अनुभूति असले किंवा अशांसारखे गूढरम्य शब्द त्या त्या शब्दांमागील तरल कल्पना सगुण आणि साकार न करतां मुक्त हस्ताने वापरत राहणें-व या सर्वांचें उदाहरणांनी स्पष्टीकरण न करणें किंवा अगदी नाखुषीने संदिग्ध व अल्प विशदीकरण करणें हा तो विशेष होय. असले टीका-लेख टीकाशास्त्रज्ञांना समजण्यासारखे असले तरी ज्या सामान्य वाङ्मयाभ्यासकांसाठी ते लिहिलेले असतात त्यांना ते रुक्ष व दुर्बोधहि होतात. त्यामुळे असल्या कठिण व सूक्ष्म विषयाचें विवेचन सोदाहरण, स्पष्ट व सुगम असावें, अशी नम्र सूचना अशा विद्वान् टीकाकारांना-सामान्य वाचकांच्या वतीने करावीसें वाटतें.

—के. ना. वाटवे.

कला-नीतिवादः ले. प्रा. दु. का. संत व प्रा. स. रा. गाडगीळ.
प्रकाशकः स्वाधीन साहित्यसंस्था पुणें, मूल्य २ रु.

'नीति आणि कलोपासना' या प्रा. ग. वा. कवीश्वर यांच्या विचारप्रवर्तक पुस्तकांतील प्रमेयांचें प्रा. दु. का. संत आणि प्रा. स. रा. गाडगीळ यांनी केलेलें परीक्षण सदर ९२ पृष्ठांच्या पुस्तिकेंत समाविष्ट केलें आहे. प्रा. कवीश्वर व या पुस्तिकेचे लेखक यांच्यामधील मतभेदाची मौज अशी आहे की 'कलेने श्रेष्ठ अशा नैतिक मूल्यांशीं सुसंगत रहावयास हवें.' 'जीवनसाधना हें साहित्याचें ध्येय असलें पाहिजे.' 'कलेने नीतिपर असावें.' हा निर्णय दोनीहि पक्षास मान्य आहे! मग मतभेद कशांत? तर या प्रश्नाकडे पहाण्याच्या दृष्टींत आहे.

अनुक्रमणिका

तसेंच नीति व जीवनध्येयें म्हणजे नेमकीं कोणतीं? आणि नीतीचीं व जीवनाचीं कांहीं अंतिम व शाश्वत मूल्यें असूं शकतात काय? याहि बाबतींत उभय पक्षांमध्ये मतभिन्नता आहे. प्रा. कवीश्वरांची या प्रश्नाकडे पाहण्याची दृष्टि अध्यात्मवादी व श्रद्धाप्रवण आहे. याचा अर्थ ती अगदीच चिकित्सक नाही असें नव्हे. या उलट या दोन तरुण लेखकांचा दृष्टिकोण पूर्ण बुद्धिवादी, ऐहिक, भौतिकवादी, ऐतिहासिक आणि वास्तववादी आहे. प्रा कवीश्वरांचा कल नीतीस शाश्वत मानण्याकडे व जीवनास अंतिम साध्य मानण्याकडे आहे, तर सदर लेखक नीतीस परिवर्तनशील व जीवनास अन्तिमसाध्यविरहित मानतात; म्हणूनच हे दोघे लेखक 'कलेने स्वकालांतील नीतीला अनुसरावें' व 'साहित्यकलेने स्वयुगप्रधान जीवननिष्ठांना आपलें ध्येय मानावें' असें प्रतिपादन करतात. कला व नीति यांच्या परस्परसंबंधांबद्दलच्या वादांत हे दोन पक्ष परस्परविरोधी नसून ते परस्परपूरक आहेत असें मी स्वतः मानतों. कारण दोन भिन्न दृष्टिकोणांतून केलेलें एकाच मताचें हें विवेचन आहे. त्यामध्ये दृष्टिविरोध असला तरी सिद्धान्तविरोध नाही. म्हणून या विषयावरील लिखाणांत ही चांगली भर पडली असेंच वाचकांचें मत होईल.

— के. ना. वाटवे

शापित आणि उःशापित— ले. सौ. इंदुमती शेवडे, नागपूर प्रकाशन, किं. २ रु.

या कथासंग्रहामध्ये सौ. इंदुमती शेवडे यांनी लिहिलेल्या आठ कथांचा समावेश करण्यांत आलेला आहे. या कथासंग्रहाचा प्रमुख विशेष म्हणजे यामधील सर्व कथा प्रेमविषयक आहेत आणि त्यांचें अंतरंग प्रेमी जीवांच्या जीवनांतील दुःखमय घटनांनी भरलेलें आहे! लेखिकेने आपल्या सभोवतालच्या विविध संसारामधून हे कथाविषय उचललेले असले तरी ही विविधता लक्षांत घेत असतां सगळीकडेच दुःखमय वातावरण चित्रित केलें गेल्याने वाचणाराचें मन त्यांत रमून जाऊं शकत नाही. आयुष्यांत सुखदुःखें हीं हातांत हात घालून येत असलीं तरी दुःखाच्या जोडीला सुखहि असतें याचा इथे विशेष मागमूस लागत नसल्याने कंटाळवाणें वाटतें.

सौ. शेवडे यांनी मानवी जीवनाकडे चिकित्सापूर्ण व बुद्धिनिष्ठ दृष्टीने पाहण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे मधूनमधून या कथांमध्ये आढळून येणारें मनोविश्लेषण ठीक झालें आहे. 'तिचें यडगें' व 'अनुद्बद्धमन' या कथा त्या दृष्टीने पाहण्यासारख्या आहेत. शापित ही कथा प्रीतीच्या होणाऱ्या दिव्य भासाचें एक वैशिष्ट्यपूर्ण चित्रण करणारी आहे. या कथेंतील अगतिक झालेल्या दोन मानवी जीवांची धडपड दर्शवितांना केलेलें स्वभावरेखनहि चांगलें उतरलें आहे.

सौ. शेवडे यांच्या या दोनतीन कथा सोडल्या तर बाकीच्या कथांचीं कथानकें बरीचशीं मामुली आहेत असें म्हणावें लागेल. जीवनांत खोलवर जाऊन काळजाला भिडेल या पद्धतीने सोडविणें जरूर असलेली नीरगाठ त्यांनी अगदीच वरवरच्या थरामधून सोडविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे त्यांनी मानवी जीवनांत मृगजळाप्रमाणे भासमान होणारे प्रश्नच अधिक हाताळलेले आहेत असें म्हणावें लागेल. चिरस्थायी प्रेमभावना रंगवावयाची तर तिचें चित्रण लेखिकेने यापेक्षाहि अधिक जिव्हाळ्याने करावयास हवें होतें. लेखिकेची लेखनशैली व वर्णन-

शैली मात्र चांगली आहे. तथापि या कथासंग्रहामध्ये स्त्रीच्या लेखणीचें वैशिष्ट्य प्रामुख्याने असें कोठेहि आढळून येत नाही. सौ. शेवडे यांनी या गोष्टीकडे जरूर लक्ष द्यावें अशी त्यांना आग्रहाने सूचना करावीशी वाटते.

—सरोजिनी बाबर.

छाया आणि प्रकाश : ( गद्यकाव्यसंग्रह ). ले. बाळकृष्ण दाभाडे,
प्रकाशक : श्री. बा. दाभाडे, छत्रीबाजार, लश्कर. मूल्य १२ आणे.

सदतीस गद्यकाव्यांचं प्रेमोपायन घेऊन ' छाया आणि प्रकाशा ' च्या रूपानं श्री. शशांक हे ग्वाल्हेरसारख्या दूरच्या संस्थानांतून मराठी वाचकांच्या भेटीला आले आहेत. ''-'शशांक' हें टोपण नांव धारण करणारे रा. बाळकृष्ण मार्तंड दाभाडे हे लेखनक्षेत्रांतील विविध भूमिका घेऊन आतापर्यंत रसिकांपुढे आलेले आहेत. ' मालती ' पुस्तकांत कवि म्हणून, ' भारतीय चित्रकला '—वगैरे पुस्तकांत प्रबंधकार म्हणून व ' वर्तिका ' पुस्तकांत गद्यगीतकार म्हणून ' शशांक ' चमकतांना दिसतात ''-या शब्दांत शशांकांची ओळख महाराष्ट्राला श्री. वामन नारायण देशपांडे यांनी पूर्वीच करून दिलेली आहे. ' आविष्कार ' नामक गद्यकाव्याच्या संग्रहानंतर आता आठ वर्षांनी ' छाया आणि प्रकाशा ' च्या रूपाने श्री. शशांक पुन्हा रसिकांच्या भेटीला आलेले आहेत.

इंग्रजांच्या आगमनानं अन् पहिल्या महायुद्धानं निर्माण केलेल्या जीवनाबद्दलच्या कुतूहलानं मराठी ललितवाङ्मयाच्या उद्यानांत अनेक नवनवीन वेलींना जन्म दिला. भावकथा, गुजगोष्ट, नाट्यछटा, गद्यकाव्य हीं त्यांपैकी कांही वेलींचीं नांवं. ह्या वेली फुलारण्याच्या आधीच तंत्राच्या कात्रीनं त्यांचं बाह्यसौंदर्य वाढविलं असलं तरी अंतःसौंदर्य मात्र नष्ट झालं. अतिरिक्त भावनावशतेनं मराठी ललितवाङ्मयाचं जितकं नुकसान झालं नसेल तितकं या बुद्धिप्रदर्शनाच्या हव्यासानं झालं असं वाटतं तें यामुळंच !—

गद्यकाव्याचंच उदाहरण घ्या. गद्यकाव्याला रूपककथा म्हणावं की ध्वनिकथा म्हणावं, गद्यगीत म्हणावं, की गद्यकाव्य म्हणावं यासंबंधी का थोडी चर्चा झाली? श्री. शशांक यांच्या 'आविष्कार' च्या प्रस्तावनेंत श्री. वामन नारायण देशपांडे, यांनी या प्रकाराला सर्रास ' गद्यगीत ' म्हणून संबोधलें आहे. पण त्याच संग्रहाच्या ' निवेदनां ' त ' गद्यकाव्य या नांवाखालीं मीं जें लेखन केलें त्यांचा हा संग्रह आहे' असें शशांकांनी म्हटलें होतें. प्रस्तुत ' छाया आणि प्रकाशा' च्या निवेदनांत देखील ' गद्यगीत ' या शब्दापेक्षा ' गद्यकाव्य ' या शब्दास मी अधिक उचित समजतों ' असें आपलें मत त्यांनी व्यक्त केलें आहे. गद्यकाव्याचं तंत्रहि ठरविण्याचा कांही टीकाकारांनी प्रयत्न केला. पण त्या तंत्रानं मराठींतल्या गद्यकाव्याला अजून आवळून टाकलं नाही ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट आहे.

इथं एक गोष्ट थोडी अधिक स्पष्ट केली पाहिजे. सौंदर्याच्या भावमूर्तींची पूजा करणं हेंच कुठल्याहि कलावंताचं वैशिष्ट्य ! पूजेला फुलं लागतात, मंत्र लागतात, अन् पूजेचं एक प्रकारचं तंत्रहि असतं. पण हीं झालीं सौंदर्याचीं बाह्य प्रसाधनं. ह्या सर्वांपेक्षा पूजेची 'भावना' महत्त्वाची असते. फुलांच्या ओझ्याखाली, मंत्रघोषाच्या आवाजाखाली किंवा तंत्राच्या बंधनाखाली भावमूर्तीला झाकून टाकणं म्हणजे का तिचं सौंदर्य वाढविणं आहे ? ललितवाङ्मयांत

अलंकार हवेत, ध्येयवाद हवा अन् ललितवाङ्मयाचं तंत्रहि हवं. पण ह्या सर्वांपेक्षा अंतरंगांतून उफाळणारी भावना अधिक प्रभावी हवी. तंत्रानं कलेचं सौंदर्य वाढतं हें मान्य, पण 'तंत्रशुद्धता' ही कलेच्या सौंदर्याची किंवा ललितवाङ्मयाच्या मूल्यमापनाची प्रधान कसोटी मानण्यांत येऊं नये. प्रेम या भावनेपेक्षा प्रेम या कल्पनेवरच प्रेम करून त्यालाच खरं प्रेम म्हणण्यासारखं नाही का तें ? मराठी वाङ्मयाच्या उद्यानांतील नाट्यछटा, गुजगोष्ट किंवा लघुनिबंध या वेलींचे अंकुर करपून जायला त्यांचं तंत्रच कारणीभूत झालं असं प्रामाणिकपणानं वाटतं.

गद्यकाव्याची परंपरा शोधतांना बाणभट्टाच्या कादंबरीइतकं किंवा वेदांतील सूक्तांइतकंहि मागं जावं लागेल. ऋग्वेदांतील यम–यमी संवाद किंवा पुरूरवा–ऊर्वशीसंवाद या विधानाची साक्ष देतील. भारताच्या काव्येतिहासांत इतिहास–पुराणांबरोबरच वेद आणि उपनिषदं यांनाहि फार मोठं स्थान आहे. बाणभट्टाची कादंबरी हा गद्यकाव्याचा उत्कृष्ट नमुना आहे. पण मराठींत जीं गद्यकाव्यं अवतरलीं आहेत त्यांचा उगम संस्कृतांत नाही; इंग्रजींत आहे. आजच्या मराठींतला कुठलाहि अभिनव वाङ्मयप्रकार घेतला तरी असंच दिसून येईल. तथापि, त्याच्या अभिव्यक्तीची पद्धति जरी पाश्चात्य असली तरी त्या अभिव्यक्तीचा आत्मा मात्र संस्कृतच असतो. वॉल्ट व्हिटमनच्या गद्यकाव्यांनी प्रभावित होऊन रवींद्रनाथ टागोरांनी आपलीं गद्यकाव्यं लिहिलीं खरीं, पण त्यांची जडणघडण पाश्चात्य असली तरीहि त्यांचा आत्मा मात्र अस्सल भारतीयच आहे हें विसरून चालणार नाही.

टागोरांच्या मूळ बंगाली गद्यकाव्यांच्या इंग्रजी भाषांतरानं मराठी लेखकांचं या वाङ्मयप्रकाराकडे लक्ष वेधलं गेलं. मराठीच्या उद्यानांत गद्यकाव्याच्या वेलीनं आता चांगलंच मूळ धरलं आहे. भावनेशीं प्रामाणिक राहून, तंत्रमंत्राची फारशी फिकीर न करतां, मराठी गद्यकाव्यकारांनी जर आपलं लेखन केलं तर ही वेल फुलारण्यास फारसा वेळ लागणार नाही. काव्यांत भावगीताचं जें स्थान तेंच गद्यांत गद्यकाव्याचंहि. गद्यांत लिहिलेलीं भावगीतंच असतात तीं. काव्य पद्यांतच व्यक्त होतं असं कुठं आहे ? उलट, छंदांचीं बंधनं झुगारून दिल्यामुळं भावनेच्या सूक्ष्मातिसूक्ष्म छटा किंवा कल्पनेचे नवनवीन उन्मेष गद्यकाव्यांतूनच अधिक परिणामकारक रीतीनं व्यक्त करतां येतात. 'गद्यं कवीनां निकषं वदन्ति' असं म्हणून वामनानं गद्यालाच काव्याचं प्रशस्तिपत्र देऊन टाकलं नाही का ?— भावकवि आणि गद्यकवि या दोघांचंहि कार्य मूलतः सारखंच आहे. दोघेहि सौंदर्यपूजक असतात. दोघांनाहि त्या सौंदर्याच्या मागं असलेल्या सत्याचं आकलन झालेलं असतं. दोघांनाहि कुठल्याहि गोष्टीच्या बाह्य तपशिलाच्या किंवा विसंगतीच्या मुळाशीं असलेल्या अंतिम संगतीचं भावदर्शन होतं. अन् दोघेहि त्या संगतीचं (Harmony) अन् त्या संगतीच्या साक्षात्कारानं त्यांना लाभलेल्या उत्कट अनुभूतीचं भावचित्रण करीत असतात. हें भावचित्रण शब्दांच्या कुंचल्यांनी करायचं असतं. प्रतिभेच्या प्रकाशांत कवीला ज्या अमूर्त आणि अपार्थिव अशा प्रतिमांची प्रतीति आलेली असते, तिच्या यथार्थ अभिव्यक्तिकरिता पद्याचं माध्यम त्याला अपुरं वाटतं. अन् म्हणून मग तो गद्यकाव्याकडे वळतो.

गद्यकाव्यांत लयबद्धता असते की नाही, असावी की नाही हें छंदःशास्त्रज्ञ सांगतील. पण मला वाटतं, लयबद्धतेसंबंधी निश्चित नियम घालून देण्याऐवजी कवीच्या भावनोद्रेकावरच

तें सोपविलेलं बरं. कवीला येणाऱ्या अनुभूतींत एक प्रकारची सुसंगति असते. या सुसंगतीमुळं त्याच्या भावनोद्रेकांतहि लयबद्धता येत असावी. ही लय छंदांच्या बंधनांत समाविष्ट करतां येत नसली, तरी भावनोद्रेकांतहि ती अंगभूतच असते.

या सर्व दृष्टींनी विचार केला असतां श्री. शशांक यांचा प्रस्तुत संग्रह सुंदर आहे असेंच कोणीहि म्हणेल. मराठींत ' गद्यकाव्यें ' लिहिणारे जे हाताच्या बोटांवर मोजण्याइतके कलावंत आहेत त्यांत शशांकांचें स्थान फार वरचें आहे. किंबहुना, प्रो. व. ग. खापर्डे यांनी मराठींत सुरू केलेल्या या प्रकाराचा पद्धतशीर विस्तार व विकास श्री. शशांकांनीच केला असें म्हणणें चूक होणार नाही. ' मरीचिका ' ' वर्तिका ' ' आविष्कार ' हे त्यांचे संग्रह या गोष्टीची साक्ष देतील. अलीकडे नागपूरचे श्री. क्रांतदर्शी बुधे यांनीहि हा प्रकार यशस्वीपणें हाताळण्यास सुरवात केली आहे.

प्रस्तुत ' छाया आणि प्रकाश ' या संग्रहांतील कांही गद्यकाव्यांतून ( मी भिकारीण नाही, पृ. १३; तुला नाही त्याची जाणीव, पृ. १४; सनातन कथा, पृ. १७ ) शशांक यांनी सूक्ष्म अशा सत्याचं सुंदर दर्शन घडविलं आहे. कांहींतून ( याचना, पृ. १८; चुंबन, पृ. ३१ ) भावनेची तरलता अत्यंत हळुवारपणानं व्यक्त केली आहे तर कांहींतून ( या अंधेऱ्या रात्री कुठे चाललास ? पृ. २०, अल्प अपेक्षा, पृ. २४ ) भावसौंदर्याच्या किरणशलाकेचं सूक्ष्म दर्शन घडविलं आहे. मी भिकारीण नाही. (पृ. १३); तुला नाही त्याची जाणीव ( पृ. १४ ); सनातन कथा ( पृ. १७ ); याचना इत्यादि गद्यकाव्यें उत्कट भावनाविष्काराच्या अन् हळुवार भाषाशैलीच्या दृष्टीनंहि उत्कृष्ट वाटतात. कलादृष्ट्या ' सनातन कथा ' हें त्यांचं भावनरमणीय गद्यकाव्य वाचकांनी अवश्य वाचावं.

श्री. शशांक यांचं अंतःकरण कवीचं आहे. अंतरंगांत हेलावणाऱ्या भावनांशीं प्रामाणिक राहण्याचा ते प्रयत्न करीत आहेत. हळुवार भावनाविष्काराला साजेशी मृदुमधुर भाषाशैलीहि त्यांच्याजवळ आहे. मराठी गद्यकाव्याच्या क्षितिजावर खरोखरीच ते 'शशांका' चं कार्य करून दाखवितील अशी आशा केल्यास ती व्यर्थ होणार नाही *

—सुरेश म. डोळके.

---

* मुद्रणाच्या दृष्टीने या पुस्तकाचा एक विशेष वाचकांच्या नजरेला आणणें अवश्य वाटतें. अनुच्चारित असे सर्व अनुस्वार वगळून हें पुस्तक छापलेलें आहे. श्री. दाभाडे यांचीं ' विद्यामंदिरात ', ' भारतीय आदर्श ' वगैरे इतर पुस्तकेंहि याच पद्धतीने त्यांनी छापलेलीं आढळतात. श्री. बा. रं. सुंठणकर यांचें ' महाराष्ट्रीय संत मंडळाचे ऐतिहासिक कार्य '; श्री. प्रबोधनकार के. सी. ठाकरे यांच्या ' जुन्या आठवणी ', ' पंडित रमाबाई ' वगैरे पुस्तकें देखील अनुच्चारित अनुस्वार वगळूनच छापलेलीं आहेत. त्यांवरून ही पद्धति मराठी लेखकांना हळूहळू मान्य होत असल्याचें दिसतें.

— संपादक.

## मराठीचिये नगरीं

संपादक

**संमेलनाचे आणि परिषदेचे नवे अध्यक्ष.**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नव्या वर्षाचे आणि ता. १२, १३ व १४ ऑक्टोबर रोजीं अमळनेर येथे भरणाऱ्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून प्राचार्य कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी यांची अविरोध निवड झाली, याबद्दल पत्रिकेतर्फे आम्ही त्यांचें अंतःकरण-पूर्वक अभिनंदन करतों. संशोधक, भाषातज्ञ आणि प्राध्यापक म्हणून त्यांचा लौकिक महाराष्ट्र-भर आहे. भाषाशास्त्र, मराठी भाषा–उद्‌गम व विकास, मराठी व्युत्पत्ति कोश आणि राजवाडे धातुकोशाला त्यांनी लिहिलेली प्रस्तावना हीं त्यांच्या प्रगाढ व्यासंगाची साक्ष देण्याला पुरेशीं आहेत. यापूर्वी अनेक छोट्यामोठ्या संमेलनांचें अध्यक्षपद त्यांनी विभूषित केलेलें आहे. त्या सर्वांत नागपूर येथील अखिल भारतीय प्राच्य विद्या परिषदेच्या अधिवेशनप्रसंगीं मराठी विभागाचे अध्यक्षपद त्यांनी गौरविलें होतें, ही गोष्ट विशेष उल्लेखनीय वाटते. त्यावेळीं त्यांनी केलेल्या भाषणांतून मराठी वाङ्मयाचें केलेलें समालोचन संक्षिप्त असूनहि सर्वस्पर्शी आणि मार्मिक होतें.

संमेलन आणि परिषद यांचे अध्यक्ष आपल्या कारकीर्दींत कांहीतरी विधायक कामगिरी करून निवृत्त झाले तर त्यांना अशा या मानाच्या स्थानीं निवडून दिल्याचें चीज होईल. यासाठी आपल्यासमोर त्यांनी विशिष्ट कार्यक्रम आखून ठेवावा व त्याची घोषणा आपल्या अध्यक्षीय भाषणांत करावी असें वाटतें. मराठी साहित्याचे आणि भाषेचे अनेक प्रश्न अनिर्णित स्वरूपांत नेहमीच पडलेले असतात. त्यांपैकी आपल्याला मानवेल आणि पेलेल असा एखादा लहानसा प्रश्न घेऊन तो शेवटपर्यंत धसाला लावण्याचा प्रयत्न झाला तरी हरकत नाही. सुमारें २५ वर्षांपूर्वी संमेलनाकडून एक 'शुद्धलेखन समिति' नेमण्यांत आलेली होती तिच्यांतील जुन्या–नव्या पंडितांनी 'त्यथार्थ मयार्थ' पद्धतीने कांही नियम ठरविले. पण आश्चर्याची गोष्ट अशी की त्यांतील अनेक सभासदांनी हे सर्व नियम स्वतः कधीच निष्ठेने पाळले नाहीत. इतकेंच नाही तर त्यांतील कांही सभासदांनी अन्यत्र स्थापन झालेल्या शुद्धलेखन समितीचे नियम बनविताना संमेलनाच्या ऱ्हस्वदीर्घ आणि अनुस्वारविषयक धोरणाचा पाठपुरावा न करतां ते अधिक लवचीक बनवले आहेत. महाराराष्ट्रांत आज अनेक लेखक अनुच्चारित अनुस्वारांना अर्धचंद्र देऊन लेखन करीत असतात. कोल्हापूर येथील 'गर्जना' आणि नागपूर येथील 'राष्ट्रशक्ति' हीं साप्ताहिकें याच पद्धतीने मुद्रित करण्यांत येतात. ही पद्धति सर्वच दृष्टींनी शास्त्रीय आणि सुलभ असल्याचें त्यांचें प्रतिपादन आहे. प्रा. कुलकर्णी यांच्यासारख्या भाषा-तज्ञाच्या हातीं संमेलनाचीं आणि परिषदेचीं सूत्रें आता आलेलीं आहेत. तेव्हां त्यांनी गेल्या पंचवीस वर्षांत शुद्धलेखनाच्या नवीन नियमांनी घडवून आणलेल्या स्थित्यंतराचें आणि निर्माण झालेल्या नवीन प्रश्नांचें सिंहावलोकन करून या प्रश्नांचा फेरविचार करणें अत्यंत प्रसंगोचित होईल असें वाटतें. प्रा. कुलकर्णी यांच्या कार्याला आम्ही सुयश चिंतितों.

अनुक्रमणिका



दोन शाखा–संमेलनें.

अमळनेर येथील साहित्य संमेलनाच्या वेळीं संमेलनांतर्गत विभाग म्हणून 'टीका' आणि 'मराठीचें अध्यापन–विद्यालयीन व शालेय' अशीं दोन शाखा–संमेलनें भरविण्यांत येणार आहेत. टीकाविभागासाठी पुण्याचे प्रा. श्री. के. क्षीरसागर आणि 'मराठीच्या अध्यापन' विभागासाठी नागपूरचे डॉ. शं. दा. पेंडसे यांची अध्यक्ष म्हणून नियुक्ति करण्यांत आली आहे. या दोन्ही शाखाध्यक्षांचें आम्ही मनापासून अभिनंदन करतों. दोघेहि आपापल्या विभागाचे अधिकारी तज्ञ आहेत. प्रा. श्री. के. क्षीरसागर आज अनेक वर्षांपासून टीकालेखन करीत असून त्यांत त्यांनी चांगला लौकिक मिळविलेला आहे. मराठींतील टीकावाङ्मयाचा इतिहास लिहितांना प्रा. क्षीरसागरांचें नांव अग्रगण्य टीकाकारांत घालावें लागेल यात शंका नाही. डॉ. शं. दा. पेंडसे हे मराठीचे एक नांवाजलेले प्राध्यापक आहेत. अभ्यासक्रमसंडळाचे सभासद वा प्रमुख म्हणून निरनिराळ्या विद्यापीठांचा त्यांचा अनुभव मोठा आहे. मध्यप्रदेशांतील हायस्कूल एज्युकेशन बोर्डातील मराठी विभागाचें गेलीं अनेक वर्षे ते आमंत्रक होते. आणि नागपूर विद्यापीठाच्या मराठी विभागाचे गेल्या अनेक वर्षांपासून ते प्रमुख आहेत. शालेय आणि विद्यालयीन मराठीच्या अध्यापनाचा त्यांचा अनुभव खोल आहे हें यावरून दिसून येईल. आपापल्या विभागाचीं शाखा–संमेलनें हे दोघेहि विद्वान आपल्या अधिकारी नेतृत्वाने यशस्वी करून दाखवितील यांत शंका नाही.

श्री. मोहनलाल भट्ट आणि मुंबई सरकारचें राज्यभाषाविधेयक.

राष्ट्रभाषाप्रचार समितीचे चिटणीस आणि राष्ट्रभारती मासिकाचे संपादक श्री. मोहनलाल भट्ट यांनी साहित्यपरिषदेच्या कार्यालयाला ता. २० जुलै रोजीं भेट दिली. राष्ट्रभाषा आणि प्रादेशिक भाषा यांच्या परस्पर सहकार्याने दोहोंचाहि उत्कर्ष कसा होईल याविषयी त्यांनी आपले विचार त्यावेळीं थोडक्यांत प्रगट केले. मुंबईसरकारच्या राज्यभाषा-विधेयकासंबंधी टिपणी लिहितांना त्यांनी तेच विचार थोडे विस्ताराने मांडलेले आहेत. राष्ट्र-भारतीच्या ऑगस्टच्या अंकांतील संपादकीयांत ते लिहितात :

"हें राज्यभाषाविधेयक हल्ली तसेंच ठेवलें आहे हें ठीक झालें. ह्यावर अधिक चर्चा व विचार होणें आवश्यक आहे. प्रादेशिक भाषा व राष्ट्रभाषा ह्यांचें आपलें असें विशिष्ट स्थान आहे. त्यांच्या मर्यादा स्पष्ट आखल्या गेल्या पाहिजेत. राष्ट्रभाषा प्रांतीय भाषेचें स्थान कधी घेणार नाही. आज कोर्टकचेऱ्यांतून अिंग्रजी भाषेंत जें काम चाललें आहे तें आम्हांला योग्य वाटत नाही. कार्याची मर्यादा लक्षांत घेतां अिंग्रजीच्या जागीं प्रांतीय भाषा किंवा राष्ट्रभाषा ह्यांचा अुपयोग करणें योग्य होय. परंतु जास्ती महत्त्व प्रादेशिक भाषांनाच यायला हवें. ज्या ज्या जागीं आज अिंग्रजीचा अुपयोग होत आहे त्या सर्व जागीं हिन्दीचा अुपयोग करावा असें म्हणणें योग्य नाही. ह्यामुळे गैरसमज अुत्पन्न होईल. अेवढेंच नव्हे तर जनतेचा द्रोह सुद्धा होण्याचा संभव आहे. कोर्टकचेऱ्यांचा आम जनतेशीं संबंध येतो. आपली प्रांतीय भाषा ते जितक्या सहज रीतीने समजू शकतात तितक्या सहज रीतीने त्याना दुसरी कोणतीच भाषा समजत नाहीत. गुजरार्थेत गुजराथी, महाराष्ट्रांत मराठी, आणि कर्नाटकांत कानडीचाच विशेषेकरून उपयोग व्हायला हवा. केवळ प्रांताप्रांतांतील व्यवहारांत आणि हायकोर्टात ज्यांचा आपल्या प्रांताच्या बाहेर संबंध येतो, तेथेच राष्ट्रभाषेचा उपयोग करणें उचित मानलें जाईल.

मुंबई प्रांतांत चार भाषांत सरकारी कामकाज झाल्यास त्यायोगें खर्च वाढेल यांत संदेह नाही. परंतु जनतेच्या सोयीकडे लक्ष द्यायचें तर सरकारला हा खर्च सहन करणें भाग आहे गुजराथेंतील जिल्ह्यांत परस्परव्यवहारांत गुजराथीचा उपयोग करणें योग्य. होय. ह्याचप्रमाणे महाराष्ट्र आणि कर्नाटक ह्यांच्या बाबतींत सांगतां येईल. मात्र कर्नाटक आणि गुजराथ ह्या जिल्ह्यांच्या कलेक्टरांच्या मध्ये हिन्दीचाच व्यवहार करण्याची आवश्यकता आहे. परंतु ही गोष्ट अपवादरूपच समजली पाहिजे.

## आशावादी आणि वैफल्यवादी नवकाव्य.

ता. १० ऑगस्ट १९५२ रोजीं पुण्याचे साम्यवादी साहित्यिक श्री. दि. के. बेडेकर यांचें, अमरावती येथील वि. सा. संघाच्या शाखासंमेलनांत सुश्राव्य असें भाषण झालें. भाषणाच्या शेवटीं मराठींतील आधुनिक कवितांचें, आशावादी व वैफल्यवादी असे दोन विभाग करून त्यांची परंपरा शोधतांना ते म्हणाले, "आज मराठी साहित्यांत जें वैफल्यवादी नवकाव्य, नवकथा व साहित्यसमीक्षा दिसत आहे त्या सर्वांना एक मागील परंपरा आहे तसेंच, जें आशावादी व लोकाभिमुख वाङ्मय दिसत आहे, त्यालाहि परंपरा आहे. वैफल्याचे सूर आळविणाऱ्यांची परंपरा व या प्रवृत्तीचा आजचा विशिष्ट आविष्कार श्री. मर्ढेकर यांच्या काव्यांत उत्कटतेने दिसतो. उलट आशावादी प्रवृत्तीचे प्रमुख प्रतिनिधी म्हणून श्री. आ. रा. देशपांडे ( अनिल ) यांचें नांव माझ्या मनांत सहजच येतें. अनिलांच्या काव्यामध्ये आपल्याला हरिभाऊ व केशवसुत यांच्या व्यक्तिवादी प्रबोधनाच्या श्रद्धांची परंपरा दिसते ' तुतारी ' ' नव्या मनूचा शिपाई ' वगैरे प्रसिद्ध कवितांतील आशय व प्रेषितांचा अभिनिवेश आपल्याला अनिलांच्या ' मानवता ' ' धडकी ' व ' पेर्ते व्हा ' या कवितांतून आढळतो. परंतु जुन्या आशयाचा व आवेशाचा हा नुसता पडसाद नाही; तर जुन्या प्रेरणेला आत्मसात् करणाऱ्या एका नवकवीची नव्या जगाला ही साद आहे. या नव्या आशावादांत व्यक्तीच्या स्वातंत्र्याची ऊर्मि सामावलेली आहे. तसेंच ' देवदानवा नरें निर्मिलें ' सांगण्याची धमकहि आहे. परंतु केवळ व्यक्तिनिष्ठा व मानवनिष्ठा यांच्या जुन्या तोकड्या अंगणांतून अनिलांनी बाहेर पाऊल टाकलें आहे. अनिलांच्या प्रेरणेमध्ये व्यक्तिवादी, स्वातंत्र्यवादी व आशावादी प्रबोधनाचा पडसाद आहेच; शिवाय त्या जुन्या श्रद्धेपेक्षा जास्त स्पष्ट खंबीर अशा समाजवादी श्रद्धेचा व मानवप्रेमाचाहि संदेश आहे.

या श्रद्धेच्या बरोबर उलटी अशी वृत्ति श्री. मर्ढेकर यांच्या कवितेमध्ये प्रगट झालेली दिसते. मर्ढेकरांच्या भयाण आणि भीषण प्रवृत्तीला आपल्या मराठी काव्यांत परंपरा आहे व ती गोविंदाग्रजांच्या काव्यांत आहे. गडकऱ्यांच्या काळापर्यंत केशवसुतांच्या आशावादाला ग्रहण लागूं लागलें होतें. सुशिक्षित वर्गाला व्यक्तिवादाच्या तत्त्वाचें भीषण एकाकीपणांत व वैफल्यांत रूपांतर झालेलें प्रतीत होत होतें. केशवसुतांच्या आशावादापेक्षा अनिलांची प्रेरणा नवी आहे. त्यांच्या परंपरेला आत्मसात् करून, तिच्या पलीकडे जाऊन भविष्याकडे पाहूं शकणारी आहे. तसेंच नातें गोविंदाग्रज व श्री. मर्ढेकर यांच्यांतहि आहे. गोविंदाग्रजांनी ' प्रेम आणि मरण ' ' ओसाड आडांतील एक फूल ' वगैरे कवितांतून जी भीषण वैफल्याची परंपरा निर्माण केली ती मर्ढेकरांनी नुसती आत्मसातच केलेली नाही तर तिच्या पलीकडे जाऊन नव्या वैफल्याची, भयाकुलतेची व मानवद्वेषांची अंधारलेली सृष्टि रचलेली आहे

गोविंदाग्रजांनी केशवसुतांचें शिष्यत्व पत्करलें आणि विवेकवादाचा व मानवी श्रेष्ठत्वाचा धिक्कार केला नाही. ध्येयाच्या मागे लागलेल्या वेड्या मानवाच्या पदरीं वंचना, निराशा व मरण येतें. एवढेंच त्यांनीं सांगितलें; पण मर्ढेकरांनी या नैराश्याच्या पलीकडे जाऊन ध्येयांचीच हेटाळणी केली आहे. ' देवांच्या मदतीला ' जाण्याची ईर्ष्या गोविंदाग्रजांनीहि सोडलेली होती, पण मर्ढेकरांना देव दिसत नाही व मानवताहि दिसत नाही. ज्ञानाचा प्रकाशहि त्यांना दिसत नाही. आज लोकसाहित्याच्या निर्मितिबद्दल जो विचार आपणा सर्वांना करावयाचा आहे, त्यासाठी हा प्रकाश अवश्य आहे. "

राष्ट्रपतिपद आणि मराठी भाषा.

ता. २३ ऑगस्ट १९५२ रोजीं केंद्रीय सरकारचे माजी मंत्री आणि महाराष्ट्राचे ख्यातनाम साहित्यिक श्री. काकासाहेब गाडगीळ यांनी नागपूर येथील विदर्भ-साहित्य-संघाला भेट दिली. त्या प्रसंगीं काकासाहेबांनी मराठी भाषेविषयी काढलेले अभिमानाचे उद्‌गार सर्वांनी हृत्पटलावर कोरून ठेवण्यासारखे आहेत. तें म्हणाले; " मी ललित साहित्याच्या क्षेत्रांत पाऊल ठेवले नसलें तरी मराठी भाषेचा मला अभिमान आहे. ' मराठी भाषा सोडायला तयार होशील तर तुला राष्ट्रपतिपद देईन ' असा जर पेच कोणी मला टाकला तर मी तावडतोब उत्तर देईन की " मी राष्ट्रपतिपद सोडीन, पण मराठी भाषा कदापि सोडणार नाहीं. " मराठी माझी मातृभाषा आहे म्हणून मी ती सोडण्यास तयार नाहीं असें कोणी समजूं नये. वडारी लोकांची मातृभाषा तुटपुंजी असली तरी ती सोडण्यास ते तयार होत नाहीत. " तेव्हां श्रीचक्रधरापासून तो अगदी न. वि. गाडगीळ यांच्यापर्यंत महाराष्ट्रांतील अनेक प्रभावशाली लेखकांनी जी भाषा गेलीं हजार वर्षें समृद्ध केली आहे, ती ते कशी सोडतील !

---

# परिषद्-वार्ता

( टिपणिसांकडून )

कार्यालयीन सभाः—कार्यकारी मंडळाची दुसरी सभा रविवार, दि. २०–७–५२ला झाली होती. अिमारतीच्या दुरुस्तीसाठीं झालेल्या अधिक खर्चास मंजुरी देण्यांत आली. डॉ. रघुवीर यांच्या परिभाषेसंबंधी व मुंबअी सरकारच्या भाषिक धोरणासंबंधीहि ठराव संमत करण्यांत आले. 'पत्रिके'च्या १००-व्या अंकातील अितिहास-पुरवणीसंबंधीहि सुधारणा सुचविणारा एक ठराव संमत करण्यांत आला. कार्यालयांतील सेवकवर्गाच्या पगारवाढीसंबंधी अहवाल तयार करण्यासाठी समिति नेमण्यांत आली. तसेंच अितर किरकोळ कामें होऊन सभा संपली.

परीक्षा–समितीची सभा याच दिवशीं घेण्यांत आली. अध्यक्षस्थानीं प्रा. वि. के. कानेटकर होते. सभेंत मुख्य काम परीक्षकनियुक्तीचें झालें. 'आचार्य' परीक्षेच्या अुमेदवारांना दर तीन महिन्यांनी टिप्पणी काढून कार्यालयाकडे पाठविण्याची जी अट होती ती काढून टाकण्यांत आली. 'प्रवेश' परीक्षेसाठी 'गद्यवेचे' सिद्ध करण्यासाठी समिति नेमण्यांत आली.

कै. वा. म. जोशी-स्मृतिदिन :— कै. वा. म. जोशी यांचा स्मृतिदिन प्रतिवर्षा-प्रमाणें दि. २० जुलैला पाळला गेला. या दिवशीं सुप्रसिद्ध कन्नड व मराठी कवि आणि समीक्षक प्रा. द. रा. बेंद्रे यांचें 'नाट्यकलाचातुर्य अथवा नाट्यसृष्टिसौंदर्याच्या चार बाजू' या विषयावर सुश्राव्य व्याख्यान झालें.

भेटी :— दि २० जुलैला कार्यकारी मंडळाची सभा चालू असतांना 'राष्ट्रभाषा-प्रचार-समिती'चे मुख्य मंत्री श्री. मोहनलाल भट्ट यांनी परिषदेस भेट दिली. कार्याध्यक्ष प्रा. माटे यांनी त्यांचें स्वागत केलें. चिटणीस प्रा. मंगरूळकर यांनी कार्यकारिणीच्या उपस्थित सभासदांची पाहुण्यांना ओळख करून दिली. श्री. भट्ट यांनी परिषदेच्या कार्याबद्दल आत्मीयता व्यक्त केली व परिषदेने केलेल्या स्वागताबद्दल आभार मानिले. मंगळवार दि. २६ ऑगस्टला हिंदीचे लेखक, कवि व पटना विद्यापीठांतील प्रा. दिनकर यांनी परिषदेस भेट दिली. परिषदेच्या वतीने त्यांचें यथोचित स्वागत करण्यांत आलें. या प्रसंगीं परस्परपरिचय व विचारविनिमय झाला. प्रा. दिनकर यांनीं आपली एक हिंदी व श्री. यशवंत यांनी आपली एक मराठी कविता गाऊन दाखविली.

व्याख्यान :— मंगळवार दि. २९ जुलैला शाहिरी वाङ्मयाचे अभ्यासक श्री. म. ना. सहस्रबुद्धे ( बारामती ) यांचें 'आध्यात्मिक शाहिरी' या विषयावर व्याख्यान झालें.

प्रा. कृ. पां. कुलकर्णीसत्कार :— अमळनेर येथे दि. १२–१३–१४ ऑक्टोबरला भरणाऱ्या ३५–व्या संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांचा परिषदेच्या वतीने पहिला प्रकट सत्कार करण्यांत आला. अध्यक्षस्थानीं श्री. अ. का. प्रियोळकर होते. प्रा. मंगरूळकर यांनी प्रास्ताविक भाषण केलें. प्रा. माटे, म. म. प्रा. पोतदार, डॉ. वाटवे, श्री. वि. द. घाटे, प्रा. क्षीरसागर, श्री. चिं. ग. कर्वे यांचीं नियोजित अध्यक्षांच्या बाबतींत गुणगौरवपर भाषणें झालीं. प्रा. निरंतर यांनी आभार व्यक्त केल्यावर सभेचें काम संपलें.

ग्रंथ-देणगी :— 'नाट्यमंडळ, पुणें' या संस्थेकडून परिषदेला रु. १२५ किंमतीचे उपयुक्त व बहुमोल असे ११ नाट्यविषयक अिंग्रजी ग्रंथ देणगी म्हणून देण्यांत आले. या देणगीबद्दल म. सा. परिषद् प्रा. रा. शं. वाळिंबे व श्री. भालबा केळकर यांची आभारी आहे.

वाङ्मय-समालोचन :— मध्यंतरीं खंडित झालेली वाङ्मय-समालोचनात्मक व्याख्यानमाला येत्या माधवराव पटवर्धन स्मृतिदिनापासून ( २९ नोव्हेंबर ) सुरू होणार आहे.

परिभाषा-चर्चा-मंडळ :— भारत सरकारच्या 'माहिती आणि परिक्षेपण' खात्याकडून सुमारें १००० अिंग्रजी शब्दांची अेक यादी परिषदेकडे आली आहे. यादींतील अिंग्रजी शब्दांना हिंदी प्रतिशब्द ठरवितां यावेत व ते सुबोधता व सार्थता या दोन कसोट्यांवर निवडावेत, अशी अिच्छा खात्याने व्यक्तविली आहे. यादी भारतांतील निरनिराळ्या १४ भाषांच्या सस्यांकडे पाठविली आहे. या बाबतींत मराठी प्रतिशब्द सुचविण्याचें कार्य साहित्य-परिषदेच्या परिभाषा-मंडळाने सुरू केलें आहे.

---

# नवीन सभासद

## तहाहयात

१. श्री. श्री. पु. गोखले, पुणें २, रु. १००
२. श्री. व. वि. लोणकर, पुणें ५, रु. १००
३. श्री. श्री. रा. पाळंदे, पुणें २, रु. ५१
४. श्री. गोविंदस्वामी ( आफळे ) रानडे, पुणें ४, रु. ५१
५. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, पुणें– २, रु. १००
६. श्री. रा. ह. मसलेकर, अुस्मानाबाद, रु. ५०

## साधारण

१. श्री. वि. दा. अुपाख्य भय्याराव अलोणी, तिरोडा ( म. प्र. ).
२. श्री. ह. कि. तोडमल, पुणें २
३. श्री. शं. गं. जोशी, अहमदनगर
४. श्री. ल. रा. मालवणकर, मुंबअी ८
५. सौ. नीला काशिनाथ रानडे, पुणें ४
६. श्री. श्री. ल. आठलेकर, पुणें २
७. श्री. श्री. न. गंधे, संगमनेर
८. श्री. आ. वा. पाटील, अमरावती
९. श्री. गं. वि. भट, सिन्नर (नाशिक)
१०. श्री. हेडमास्तर, विद्यामंदिर, निपाणी
११. श्री. पी. व्ही. देशपांडे, महुवा ( सुरत )
१२. श्री. आ. अि. भारंबे, फैजपूर ( पू. खा. )
१३. प्रा. ग. त्र्यं. देशपांडे, अमरावती
१४. डॉ. मा. गो. देशमूख, नागपूर १
१५. डॉ. वा. ब. करंबेळकर, नागपूर २
१६. श्री. प. र. हेंद्रे, पनवेल
१७. श्री. का. शि. जोशी, पुणें २
१८. श्री. शं. द, घाटे, मडगांव (गोवा)
१९. अ. रा. नाअीक, बेळगांव
२०. श्री. के. रा. जोशी, बुधगांव
२१. श्री. भ. रा. नाअीक, बुधगांव
२२. श्री. ना. ब. भोसले, बुधगांव
२३. श्री. व. अ. कुंभोजकर, सांगली
२४. श्री. भा. श्री. ठाणेदार, सांगली
२५. श्री. ना. द. तांडफळे, महाड
२६. सौ. वसुंधरा पटवर्धन, पुणें २
२७. प्रा. धुं. गो. सप्रे, अिंदूर
२८. श्री. दि. र. लेले, सोलापूर
२९. श्री. मीनाक्षी साने, सोलापूर
३०. श्री. वि. रा. पाटील, सोलापूर
३१. सौ. रमाबाअी भास्करराव नाद, सोलापूर
३२. श्री. ज. ह. रावल, सोलापूर
३३. सौ. चंचलादेवी चंदूलाल गांधी, सोलापूर
३४. श्री. वि. मु. बोवलेकर, मुंबअी २८
३५. श्री. वा. स. मोडक, गगनबावडा ( कोल्हापूर )

---

अनुक्रमणिका

## साभार स्वीकार

१. गृहप्रवेश ( काद. )—ले. तु. ता. सावंत, प्रका. ताडदेव बुकडेपो, मुंबई ७; मूल्य ३ रु.

२. सामवेद ( कविता )— कवि विलास, प्रका. सौ. मंगला बापट. नाशिक रोड; मूल्य २॥ रु.

३. मालंच ( काद. ) अनु. काका कालेलकर, प्रका. नवजीवन मुद्रणालय, अहमदाबाद ९; मूल्य १॥ रु.

४. सुश्लोकमानस ( बालखंड ) अनु. व प्रका. डॉ. रा. चिं. श्रीखंडे, मंगळवार, कोल्हापूर; मूल्य ५ रु.

५. श्यामली ( कथा ) ले. अिंदिरा संत, प्रका. अेन् के. पब्लि. हाअूस, पुणें २; मूल्य १॥ रु.

६. बाबू बाळाचा ग्रंथराज —ले. दे. ना. टिळक, प्रका. के. भि. ढवळे, मुंबई ४; मूल्य १। रु.

७. गोड विसावा ( कविता )—कवि सी म. बापट, प्रका. ए. पी. चौगुले, बेळगांव; मूल्य २॥ रु.

८. सुशिक्षित सासुरवास (नाटिका)- ले. सौ. मालती जोशी, ग. पां. परचुरे प्रका. मंदिर, मुंबई ४; मूल्य ॥.

९. चैत्रपालवी ( कथा ) ४ ले. शिरीष अत्रे, ग. पां परचुरे प्रका. मंदिर, मुंबअी ४; मूल्य २॥ रु.

१०. माझा नाटकी संसार ( खंड २ )— ले. मामा वरेरकर, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबअी ४; मूल्य ३ रु.

११. सावरकर-दर्शन ( व्यक्ति नी विचार )—ले. भा. कृ. केळकर, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबअी ४; मूल्य ६ रु.

१२. आमचा पण गांव—ले. चिं. वि. जोशी, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २, मूल्य ४ रु.

१३. संत-कवि ( मराठीचे पंचप्राण माला १ )—ले. दा. न. शिखरे, दि टीचर्स आयडियल पब्लि. हाअूस, पुणें २; मूल्य ॥=

१४. निबंधकार ( मराठीचे पंचप्राण माला २ )—ले. दा. न. शिखरे, दि टीचर्स आयडियल पब्लि. हाअूस, पुणें २; मूल्य ॥

१५. निबंधकार ( मराठीचे पंचप्राण माला ३ )—ले. दा. न. शिखरे, दि टीचर्स पब्लि. हाअूस पुणें २; मूल्य ॥=

१६. अेस्. अेस्. सी. भूगोल—ले. भा. शा. कवनूरकर., गं. म. साठे, मा. गो. काटदरे, दि टीचर्स आयडियल पब्लि. हाअूस, पुणें २; मूल्य १। रु.

१७. साक्षात्कार ( पूर्वार्ध ) कवि—श्री. शारदा प्रकाशन, चांदा ( म. प्र. ), मूल्य २॥ रु.

१८. अुन्मेष आणि अुद्रेक ( कविता)— कवि-भ. श्री. पंडित, प्रका. के. भि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य २॥ रु.

१९. ज्ञानकण ( विचारसंग्रह )—संग्रा. व प्रका. वि. श्रा. चौधरी, सांगवी (पू. खा); मूल्य. ॥

२०. सेवा-रत्न-मंजूषा-अनु. सुमतीलाल शहा, प्रका. ज्ञानोपासक मंडळ, अभोणें ( नाशिक ); मूल्य ॥

२१. सैन्य चाललें पुढे ( काद. ) ले— वि. वि. बोकील, प्रका. सुरसग्रंथमाला, पंढरपूर; मूल्य ३ रु.

२२. कावळा व ढापी ( कादं. )—ले. के. न. चिं. केळकर, सुरसग्रंथमाला, पंढरपूर; मूल्य ४ रु.

२३. कर्मवीर भाऊराव पाटील—ले. अ. के. घोरपडे, प्रका. लेखन–वाचन–भांडार पुणें २; मूल्य २। रु.

२४. हिंदी भाषांतर पाठमाला (भाग१) —ले व. प्रका. व. सि. कानविंदे, नेलरोड, नागपूर १; मूल्य ।=

२५. श्रीअेकनाथ–दर्शन—प्रका. श्री. अेकनाथ संशो मंदिर औरंगाबाद; मूल्य ८॥ रु.

२६. विरलेल्या गारा—ले. न. शे. पोहनेरकर, प्रका. जोशी ब्रदर्स, गोळीगुडा, हैद्राबाद; मूल्य १॥ रु.

२७. विजली (कविता)—कवि. वसंत बापट, साधना प्रकाशन, मुंबअी ११; मूल्य २॥ रु.

२८ चरित्रें—( प्रो. रामानुजम्, जगदीश चंद्र बसू, सी. व्ही रामन्, आल्बर्ट आअीन्स्टन, अिरीन ज्योलियो क्यूरी, ) चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.

---

## महाराष्ट्र–साहित्य–परिषद्
### विशेष साधारण सभा
### दि. १।१०।१९५२

सा. न. वि. वि.

वृत्तपत्रांत पूर्वी प्रकट केल्याप्रमाणे परिषदेची विशेष साधारण सभा अमळनेर येथें ( प्रताप कॉलेजच्या सभागृहांत ) सोमवार दि. १३।१०।५२. ला सकाळीं ११ वाजतां भरणार आहे. आपण अुपस्थित व्हावें, ही विनंती.

कामें

१. मागील सभेचें अितिवृत्त वाचून संमत करणें.
२. दुरुस्त्या.
३. आगामी संमेलनाच्या निमंत्रणांचा विचार.
४. ठरावांची अंमलबजावणी.
५. अितिहास–योजनेचें निवेदन.
६. अध्यक्षांच्या संमतीनें आयत्या वेळीं येणारीं कामें.

अ. गं. मंगरूळकर,
गं. भा. निरंतर,
श्री. शं. नवरे,
चिटणीस.

अ. का. प्रियोळकर,
अध्यक्ष.
श्री. म. माटे,
कार्याध्यक्ष.

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, लि०, १९८/१७, सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—अ. गं. मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक-रस्ता, पुणें २.

अनुक्रमणिका



## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास (मानभावअखेर)
लेे.— बा. अ. भिडे (प्रति शिल्लक नाहीत.)

२. महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-अितिहास— ले. म. म. प्रा. द. वा. पोतदार
मूल्य रु. ३, सभासदांस रु. १॥ (ट. ख. निराळा)

३. प्राचीन पत्रवेचे भाग १ व २ (प्राइज-परीक्षेस लावलेले)—मूल्य रु. २।=

४. वाङ्मयीन समालोचन (१९४७) मूल्य रु. २, सभासदांस रु. १॥

५. शुद्धलेखन-नियम—मूल्य १॥ आणा (ट. ख. निराळा)

६. वाङ्मयीन वाद (परिषद्-पुरस्कृत)— मूल्य रु.३, सभासदांस रु.२८=

७. संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति— ले. प्रा. गं. बा. सरदार,
मूल्य २ रु. (सभासदांस १॥ रु.; ट. ख. वेगळा)